लोकहितवादी.



सरदार

रावबहादूर

# गोपाळराव हरि देशमुख

जे. पी.

दिल्लीचे शेवटचे क्षत्रिय महाराज

# पृथ्वीराज चव्हाण

## यांचा इतिहास.



हा ग्रंथ

चारणकविकुलश्रेष्ठ चंद बरदाई याच्या

'पृथ्वीराजरासा'

नांवाच्या चारण भाषेंतील प्रसिद्ध काव्यग्रंथाधारें

रा० रा० आत्माराम केशवजी द्विवेदी

यांनीं सारांशरूपें गुजराथींत उतरला.

त्यावरून मराठी भाषेंत

**लोकहितवादी**

यांनीं केला,

त्याची ही चवथी आवृत्ति

मुंबईत,

तुकाराम जावजी यांनीं

आपल्या "निर्णयसागर" छापखान्यांत छापून

प्रसिद्ध केली.

---

१९१०.

---

किंमत आठ आणे.

महाराष्ट्र देशांतील लोकांमध्यें ग्रंथसमृद्धिद्वारें
ज्ञानवृद्धि व्हावी या हेतूनें, देशबांधवांस
हा ग्रंथ परमप्रीतिपुरःसर अर्पण
केला आहे.

लोकहितवादी.

# दुसऱ्या आवृत्तीची सूचना.



दिल्लीचे शेवटचे क्षत्रिय महाराज पृथ्वीराज चव्हाण यांचा हा इतिहास प्रथमतः 'लोकहितवादी' या मासिक पुस्तकांतून सन १८८३ सालीं प्रसिद्ध झाला. हा इतिहास फार मनोरंजक व उपदेशपर असून आपल्या भाषेंत या विषयावर हें एकच पुस्तक आहे. ह्याच्या प्रती सध्यां दुर्मिळ झाल्याकारणानें आह्मी ग्रंथकर्त्याचे परवानगीनें ही आवृत्ति छापिली आहे. यांत मागच्या आवृत्तींतील बहुतेक अशुद्धें फॉर्बस्कृत 'रासमाला' आणि टॉड्कृत 'राजस्थानाचा इतिहास' या ग्रंथांच्या आधारानें दुरुस्त केलीं आहेत. हें पुस्तक प्रत्येकाच्या संग्रहीं असावें, अशी याची योग्यता आहे.

जावजी दादाजी,

'निर्णयसागर' छापखान्याचे मालक.



## तसबिरीचा खुलासा.

मध्यभागीं, हातांत कमान व पायांत आणि गळ्यांत सांखळदंड असणारा तो **पृथ्वीराज चव्हाण** होय. त्याला **शहाबुद्दीन गोरीनें** अंधळें केलें होतें.

**पृथ्वीराजाचे** समोर जवळच हातांत भाला वगैरे घेऊन उभा आहे तो **चंद भाट** होय.

**पृथ्वीराजाचे** मागें डोक्याचे बाजूला उंचावर सात लोखंडी तवे लटकविलेले असून त्यांवर शब्दवेधशरसंधान करून आरपार बाण काढण्याची अट होती.

**पृथ्वीराजाचे** समोरच उंच सज्जासारखी जागा आहे, तींत **शहा-बुद्दीन गोरी** वगैरे दरबारी मंडळी बसली असून **गोरीच्या** मस्तकास **पृथ्वीराजाचा** बाण भेदून गेल्यामुळें तो तक्तावरून खालीं पडत आहे.

शेवटीं, खालच्या बाजूला दोघेजण एकमेकांच्या गळ्यांवर तरवारी मारीत आहेत. ते **पृथ्वीराज चव्हाण** आणि **चंद भाट** हे होत.

# अनुक्रमणिका.



**उपक्रम.**—१.उपोद्घात.—२.पृथ्वीराजरासा.—३.भाटांविषयीं माहिती.—४.राजस्थान व गुजराथ या प्रांतांचे इतिहास.—५.पृथ्वीराजरासा यांतील गुणदोष.—६. हा ग्रंथ व या इतिहासावरून पूर्वीची माहिती.—७. अजमीरचा पीर.—८. अजमीर.—९. हा ग्रंथ लिहिण्याचा हेतु.

पृष्ठें १–१०

**प्रकरण पहिलें.**—क्षत्रियवंशाचा प्राचीन इतिहास.—हस्तिनापूरचा राजा अनंगपाळ. पृथ्वीराजाची मातृपीठिका.—चव्हाणवंश. पृथ्वीराजाची पूर्वपीठिका.—पृथ्वीराजाचा जन्म. चव्हाण व राठोड या उभय कुळांत कलह.—दिल्लीशहर.—नागोरचा खजिना.—पृथ्वीराजाचा विजय.

पृष्ठें १–८.

**प्रकरण दुसरें.**—चामुंडराय.—रोशन अल्लीचीं अद्भुत कृत्यें.—मीरासाहेबाची तयारी.—मीरा व त्याचे लोक हिंदुस्थानांत येतात.—खिंग नांवाचा घोडा.—मुसलमानांची लढाईची उद्युक्तता.—चामुंडरायाचा प्रयत्न व सिद्धि.—चामुंडरायाची प्रतिज्ञा.—चामुंडरायाचा विजय.—ख्वाजा पीराचें हिंदुस्थानांत आगमन.—ख्वाजा पीराशीं संधि करण्यास चंद भाट जातो.–पृथ्वीराजाचें अजमीराहून प्रयाण व अजमीरावर मुसलमानांचा ताबा.

पृष्ठें ८–१८.

**प्रकरण तिसरें.**—पट्टणचा राजा भोळा भीमदेव.—भीमदेवाशीं प्रमारराजाची लढाईची तयारी.—प्रमारास पृथ्वीराजाचें साह्य.—पृथ्वीराजाचे सैन्याची व्यवस्था.—पृथ्वीराजाचा भीमदेवावर विजय.—प्रमारकन्या इच्छनीकुमारी इजसीं पृथ्वीराजाचा विवाह.

पृष्ठें १८–२४.

**प्रकरण चौथें.**—पृथ्वीराजाकडून पद्मावतीचें पाणिग्रहण.—शहाबुद्दीनाशीं युद्धप्रसंग व त्याचा पराजय.—महोबाचा राजा परमाल याजबरोबर कलह.—परमालाचे सरदार उदल व अल्ह यांस परमालाकडून हद्दपारीची शिक्षा.—पृथ्वीराजाची चंदेला(बुंदेलखंडा)वर स्वारी.—लढाईवि-

षयीं परमाल राजाचा विचार.—त्याची तयारी व लढाईंत पराजय.—अल्ह व उदल यांस परत बोलावण्याचा विचार. त्यांस आणण्याकरितां परमालाकडून जगनक भाटाची रवानगी.—त्यांचें महोबास पुनरागमन.—युद्धाची सज्जता व तिचें वर्णन.—अल्ह व उदल लढाईला निघतात.—परमाल राजा भिऊन पळून जातो.—याचा पुत्र ब्रह्मजित् याचें धैर्य.—महोबा येथील लढाईची सुरुवात. उदल याचें शौर्य आणि त्याचा मृत्यु.—उदल याचें वर्णन.—अल्ह याचा पराक्रम.—ब्रह्मजिताचा पृथ्वीराजाकडून अंत.—अल्ह शस्त्रत्याग करून वैराग्य धारण करितो व रणांतून चालता होतो.—महोबाचे लढाईचा शेवट व पुढील व्यवस्था.—पृथ्वीराज दिल्लीस परत जातो.

पृष्ठें २४–३९.

**प्रकरण पांचवें.**—कनौजचा राजा जयचंद.—त्याचा राजसूययज्ञाचा बेत.—त्याला सुमतिप्रधानाची हरकत.—राजसूययज्ञाची तयारी.—पृथ्वीराजाची यज्ञास प्रतिकूलता.—पृथ्वीराजाचे पारिपत्यार्थ वालुकारायाची योजना.—पृथ्वीराजाचा जयचंदास विघ्न करण्याचा विचार.—वालुकारायावर कन्ह चव्हाणास पाठवितात.—कन्हाचें व वालुकारायाचें युद्ध व त्यांत वालुकारायाचा मृत्यु.—राजसूययज्ञास विघ्न व त्याची असांगता.—राजकन्या संयोगता.—तिला सखीचा उपदेश.—वसंतवर्णन.—संयोगतेचें उत्तर. जयचंदाचा कन्या संयोगतेच्या हट्टासंबंधानें खेद.—संयोगतेला सखीचा पुनरुपदेश.—संयोगतेचा शेवटचा जबाब. कन्येच्या सुधारण्याविषयीं जयचंदाचा निरुत्साह आणि संयोगतेला बंदी.

पृष्ठें ३९–४७.

**प्रकरण सहावें.**—प्रकरणप्रस्ताव.—पृथ्वीराजाचे कंठमणि.—कयमाषाचें वर्णन. चामुंडराय व त्याजवरील संकट.—चामुंडरायाकडून मत्त हत्तीचा वध.—चामुंडरायाला कैद व त्याचा शस्त्रत्याग.—पृथ्वीराज कयमाष प्रधानाकडे राज्य सोंपवून मृगयेस जातो.—कयमाषाचा कारभार व त्याचें अविचारी कृत्य.—कयमाषाच्या अविचारी गुप्त कृत्याचा स्फोट.—त्याचा पृथ्वीराजाच्या हातानें वध.—कर्नाटकी वेश्या कनौजास जाते.—कयमाषाच्या मृत्यूचें देवीकडून चंदाला कथन.—कयमाषाच्या स्त्रीचें सह-

गमन.—पृथ्वीराजाचें शिकारीस जाणें व तेथें दुर्गा केदाराची भेट.—शहाबुद्दीन गोरीचा दुसऱ्यानें पराभव.—त्याशीं सल्ला.

पृष्ठें ४८–५५.

**प्रकरण सातवें.**—कनौजावर जाण्याची तयारी.—कनौजदरबारांत चंद व पृथ्वीराज यांचें गमन.—चंदाकडून जयचंदाची स्तुति.—जयचंदाकडून चंद भाटाचा उपहास.—जयचंद व चंद यांचीं उत्तरें प्रत्युत्तरें.—जयचंद चंदाचा सत्कार करितो.—त्यांचें परस्पर संभाषण.—चंद भाट गोरीच्या पराभवाची हकीकत जयचंदास सांगतो व पृथ्वीराजाची तारीफ करितो.—पृथ्वीराजाला ओळखून काढण्याविषयीं जयचंदाचा प्रयत्न.—कर्नाटकीच्या चातुर्यानें संकटमुक्ति.—चंदाकडे नजरनजराणे आणि भेटी जातात.—पृथ्वीराजाचें गुप्तरूप कळतें.—पृथ्वीराज व चंद यांचीं भाषणें.—लंगडीरायाची जयचंदावर योजना.—लंगडीरायाचा अंत.—पृथ्वीराज व राजकन्या संयोगता यांची नजरानजर.—दासीबरोबर पृथ्वीराज संयोगतेच्या महालांत जातो.—पृथ्वीराज व संयोगता यांचा संवाद.—त्या उभयतांचा गांधर्वविधीनें विवाह.—पृथ्वीराज संयोगतेच्या महालांतून निघतो.—त्याची व पठाणाच्या टोळीची चकमक.—कन्ह व पृथ्वीराज यांचा संवाद.—संयोगतेला कनौजाहून दिल्लीस घेऊन जाण्याचा बेत.—संयोगतेचीही दिल्लीस जाण्याविषयीं संमति.—पृथ्वीराज व संयोगता यांचें दिल्लीस प्रयाण.—पृथ्वीराज जयचंदास निरोप पाठवितो.—जयचंदाचा रोष आणि पृथ्वीराजाचा पाठलाग.—आततताई व कहरकंठीर यांचा संग्रामांत अंत.—कहरकंठीर याची हकीकत.—आततताईचें पूर्ववृत्त.—पृथ्वीराजाच्या व जयचंदाच्या लोकांचें तुमुल युद्ध.—पृथ्वीराजाचा भाचा अल्हन व त्याचें चरित्र.—पृथ्वीराज मोठ्या कष्टानें दिल्लीस येतो.—जयचंद पृथ्वीराजाचें व संयोगतेचें लग्न लावितो.

पृष्ठें ५६–८२.

**प्रकरण आठवें.**—दिल्ली येथील लग्नोत्सव.—लग्नोत्सवसंबंधी मेजवान्या व करमणुकी.—पृथ्वीराजास चक्षुःश्रवा ऋषीचा शाप.—पृथ्वीराजाचा मदांधपणा आणि असावधगिरी.—त्याला शुद्धीवर आणण्याचा उपाय.—त्याकरितां त्याला चिठ्ठी जाते.—संयोगतेच्या आज्ञेवरून तिच्या

वासी चिठ्ठी नेणाऱ्या चंद भाट वगैरेंस मारितात.—राजा व राणी हींही त्यांचा उपमर्द करितात.—चंदाचा व हाहुलीरायाचा संवाद.—हाहुली-राय दिल्लींतून निघून जातो व दिल्लीवर महत्संकट.—हाहुलीराय गिझनीस जातो व शहाबुद्दीनास घेऊन दिल्लीवर येतो.—चितोडचा राणा समरसिंह रावळ हा दिल्लीचे रक्षणार्थ येतो.—समरसिंहाचें वर्णन.—तो पृथ्वीराजा-कडे पोपटाबरोबर निरोप लिहून पाठवितो.—त्या संबंधानें पृथ्वीराज व संयो-गता यांचें संभाषण.—राजाचें राजवाड्यांत आगमन.—समरसिंहाचा सत्कार व प्रजाजनांचें आनंददर्शन.—वीरभद्राचा आविर्भाव.—त्याचें भ-विष्यकथन.—भविष्यकथनानें राजाचा हवालदीलपणा आणि वीरभद्राक-डून समाधान.—पृथ्वीराजाचें दुःस्वप्न.—त्याबद्दल संयोगतेकडून समा-धान.—दुःस्वप्नशांत्यर्थ उपाय.—फौजेची तयारी आणि संयोगतेचा अभि-प्राय.—पृथ्वीराज व संयोगता यांची शेवटची भेट.—पृथ्वीराजाकडील फौजेची व्यवस्था.—दोन्ही लष्करांचा सामना.—पृथ्वीराज पकडला जातो.—समरसिंहाचा मृत्यु.—राजपुत्र रेणसी याचा मृत्यु.—या लढाईचें ठि-काण.—जयचंदाचा मृत्यु व कनौजाची उद्ध्वस्तता—मुसलमानांचे पुंडावे आणि हिंदुस्थानांतील अराजकता.—पृथ्वीराजाचे अंताविषयीं दोन मतें.—चंद भाटाचें गिझनीस गमन व पृथ्वीराजाची भेट.—पृथ्वीराजाचा शब्दवे-धचमत्कार पाहण्याची मसलत.—शब्दवेधचमत्कार पाहण्याची तयारी.—पृथ्वीराजास चंदाचा इशारा.—पृथ्वीराजाचें शरसंधान व शाहाबुद्दीनाचा शेवट.—पृथ्वीराज व चंद यांचा अंत.—उपसंहार.

पृष्ठें ८२–११०.

---

# उपक्रम.

१. उपोद्घात.—२.पृथ्वीराजरासा.—३.भाटांविषयीं माहिती.—४. राजस्थान व गुजराथ या प्रांतांचे इतिहास —५.पृथ्वीराजरासा यांतील गुणदोष.—६.हा ग्रंथ व या इतिहासावरून पूर्वीची माहिती.—७.अजमीरचा पीर.—८.अजमीर.—९. हा ग्रंथ लिहिण्याचा हेतु.

१. प्राचीनकाळीं **मुसलमान** वगैरे अन्यधर्मी लोक या देशांत नव्हते, तेव्हांपासून या **भारतवर्षांत** मोठमोठे पराक्रमी **क्षत्रिय राजे** राज्य करीत होते. परंतु घटीयंत्राप्रमाणें पतनोन्नतीचा जो स्वाभाविक धर्म त्याला अनुसरून पुढें पडल्या काळीं त्या सर्व शूर **क्षात्र**-वंशांचें शौर्यौदार्य नष्ट होऊन ते सर्वप्रकारें हत झाले; व याप्रमाणें **क्षात्र**धर्मी राजांची, **पृथ्वीराज चव्हाण** याचे बरोबरच एकंदर परिसमाप्ति झाली. पूर्वीपासून आपल्या इकडे इतिहास लिहून ठेवण्याची वहिवाट व हौस नसल्यामुळें आजपर्यंतच्या अनंतकाळचा इतिहास, गेलेल्या काळाबरोबरच विलयाला जाऊन त्या काळाचें ज्ञान काय तें नाममात्रावशेष राहिलें आहे! ही स्थिति पाहून इतिहासप्रिय आणि प्राचीनज्ञानलालस जन फार दुःखी होतात. परंतु त्यास आतां इलाज नाहीं. अशी गोष्ट आहे तरी या **पृथ्वीराजा**जवळ **चंद वरदाई** ह्मणून एक **भाट**[1] होता. त्याणें **पृथ्वीराजा**चे इतिहासाचा ग्रंथ पद्यात्मक केला असून त्या ग्रंथाचा विस्तार एक लक्ष श्लोकांइतका आहे. या ग्रंथाची प्रख्याति **रजपूत** लोकांमध्यें फार असून त्याच्या प्रती ठिकठिकाणीं आहेत. त्याचप्रमाणें **रजपूत** राजांचे दरबारांत **भाट** लोक तो इतिहास वाचीत असतात. प्राचीनकाळच्या **राम-युधिष्ठिरां**च्या संबंधानें जसे '**रामायण**,' '**भारत**,' हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत, तसेच अर्वाचीन **क्षत्रिय** राजांपैकीं **पृथ्वीराज चव्हाण** या राजाचा हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. या ग्रंथाचे '**भारता**'प्रमाणेंच पर्वांनीं भाग पाडलेले असून हीं पर्वें ६९ आहेत.

२. विक्रम संवत् १२४९ ह्मणजे इ० स० ११९३ सालीं हा राजा **हस्तिनापुरास** कैद होऊन **दिल्लीस मुसलमान** बादशाही स्थापन झाली. त्या काळीं **क्षत्रियवंश** कोठें होते व त्यांची काय व्यवस्था होती हें

---

१. ह्याविषयींची सविस्तर माहिती पुढें कलम ३ मध्यें दिली आहे ती पहावी.

समजण्यास हा 'रासा'ग्रंथच काय तो राहिला आहे. हा 'पृथ्वीराजरासा' अलीकडे बंगालच्या 'एशियाटिक् सोसायटी' नामक प्राचीनग्रंथप्रकाशक मंडळीनें कलकत्त्यास छापण्याची सुरुवात केली आहे. परंतु हा ग्रंथ फार मोठा असल्यामुळें हल्लीं[1] छापणें चाललें आहे याच क्रमानें जर तो छापून प्रसिद्ध होत जाईल तर त्याचें एकंदर प्रकाशन होण्यास निदान दहा वीस वर्षें तरी लागतील असा अजमास आहे. बरें, देशी राजे किंवा एतद्देशीय ऐपतदार लोक यांणीं या संबंधानें पुढें होऊन असला प्राचीन ऐतिहासिक ग्रंथ आपल्या खर्चानें प्रसिद्ध करून लोकांस मिळेसा करावा; परंतु त्यांस ग्रंथप्रसिद्धीचा अथवा पुरातनइतिहासवाचनाचा व शोधनाचा मुळींच छंद नसून त्या हौसेचें बीजच या देशांत आजपर्यंत कधीं पेरलें गेल्याचा दाखला मिळत नाहीं! तेव्हां आतांच आमच्या देशबंधूंस त्याविषयीं हौस कोठून उत्पन्न व्हावी? या अशा उदासीनतेमुळें या देशाचा इतिहास व श्रेष्ठपणा अगदीं नष्ट होऊन या आर्यावर्तांतल्या विद्यादेवीनें गाढ शयन केलें आहे! तरी आलीकडे इंग्रज सरकारच्या उत्तेजनानें कांहीं प्राचीन माहिती मिळविण्याचे प्रयत्न सुरू झाले आहेत; व जसजसें लोकांमध्यें विचाराचें बीज पेरलें जाईल, तसतसे तेही शोध करूं लागून त्यांजमध्यें स्वदेशाचा अभिमान उत्पन्न होईल अशी आशा आहे.

३. ज्या अर्थीं या ऐतिहासिक ग्रंथाचा कर्ता भाट आहे त्या अर्थीं या भाटांविषयींही येथें थोडीशी माहिती देणें अप्रासंगिक होणार नाहीं. भाट यांचा धंदा राजवंशांच्या हकीकती व चरित्रें कविताबद्ध करावीं, व तीं राजांस वाचून व ह्मणून दाखवावीं. भाटलोक जेथें क्षत्रिय राजे असतात तेथें आहेत. 'भाट' या शब्दाचा वाचक संस्कृतांत 'बंदी' हा शब्द आहे, व बंदीजनांनीं हीं राजचरित्रें गावीं असाच त्यांचा धंदा वर्णिला आहे. हल्लींही गुजराथ, काठेवाड व राजपुताना येथें ही भाटजाति फार आहे; व त्यांस तेथील राजांकडून इनामें, मानमरातब, लग्नकार्यांत पोषाख, वगैरे मिळत अ-

---

१. सन १८८६ मध्यें जेव्हां हा उपोद्घात प्रथम लिहिला गेला, त्या वेळेचें हें ह्मणणें आहे. हल्लीं हें छापणें अजीबात बंद आहे असें समजतें.

सतात. क्षत्रियवंशास पडता काळ आला तशी भाटांचीही दुर्दशाच होत गेली. तथापि ज्या ज्या राजांजवळ हल्लीं हे भाट आहेत ते ते त्यांस ब्राह्मणांपेक्षांही अधिक मानून, त्यांचा मानमरातब व देणग्या हीं रीतीप्रमाणें देण्यास कोणीही हरकत आणीत नाहींत. भाटांस विश्वासू व प्रामाणिक असें समजतात व ह्मणून, ज्यांस भाट जामीन मिळेल तो दरबारांत मान्य झालाच असें समजावें. मुली व स्त्रिया यांजबरोबर पाठराखणीस व सोबतीला देण्यास योग्य अशीं मनुष्यें भाट हेच आहेत असें समजतात. भाट ह्मणजे बंदीजन आणि बंदीजन ह्मणजे स्तुतिपाठक. तेव्हां भाटांनीं आपल्या राजवंशाची स्तुति गावी असा संप्रदाय दिसतो व त्याप्रमाणेंच आहे. यावरून, भाटांनीं आपल्या राजवंशाचीं जीं वर्णनें लिहिलीं आहेत त्यांवरून त्या राजांच्या स्तुतिपर इतिहासाखेरीज इतर खरे मजकूर समजणें जरा कठीणच आहे असें दिसतें. या भाटजातींत कित्येक फार मोठाले कवि होऊन गेले आहेत व त्या महाकवींपैकींच प्रस्तुत ग्रंथकार हा एक मोठा कवि होता. भाट हे सदैव राजांचे संनिध असून हरएक प्रसंगीं सत्कृत्यें, औदार्य व शौर्य यांजकडे त्यांची प्रवृत्ति व्हावी ह्मणून त्यांच्या पूर्वजांचीं सुगुणवादपूरित गीतें ह्मणून व त्यांची स्तुति करून ते त्यांस प्रोत्साहन देतात. राजवंशांची कीर्ति किंवा अपकीर्ति वाढविणारे हे भाटच असत, व त्याकरितां अर्थात् त्यांचा असंतोष होईल असें कृत्य करण्यास कोणी धजत नसत. त्यांचें ह्मणणें सर्वांनीं मान्य करावें असें वजन ते राजादिकांवर घालीत व तें त्यांनीं अमान्य केलें तर ते त्रागा व झांसा ह्मणजे कांहीं आततायी-

१. त्रागा ह्मणजे आपले घरचा माणूस मारून त्याचें डोकें कापून सरकारचे कचेरींत किंवा शत्रूचे घरीं टाकणें, व 'ही हत्या तुजवर पडली' असें सांगणें. ह्या त्राग्याविषयींचें अगदीं आलीकडील उदाहरण—इ० स० १८६० सालीं खंडेराव महाराजांनीं जमीनमोजणी केली, तेव्हां कडीच्या भाटांनीं असाच त्रागा केला होता, हें पुष्कळांस माहित असेलच. २. झांसा ह्मणजे अमक्याचें घर जाळूं किंवा अमक्यास मारूं असें कागदावर लिहून तो कागद झाडांस बांधून तेणेंकरून भय दाखविणें.

पणाचे उपाय करीत. याविषयींच्या अनेक गोष्टी प्रसिद्ध आहेत. हल्लीं जशीं वर्तमानपत्रें, शाळेंतलीं मुलें व गुरूपगुरु वगैरे सुशिक्षित मंडळी कीर्ति अथवा दुष्कीर्ति वर्णन करण्यांत पुढारी आहे, तशीच भटजाति (ब्राह्मण) व भाटजाति पूर्वकालीं सुकीर्ति किंवा दुष्कीर्ति पसरविणारी असे. पूर्वी मोठमोठ्या युद्धांतून व लढायांतून भाट हे राजांबरोबर राहून त्यांस, वर सांगितल्याप्रमाणें त्यांच्या पूर्वजांचीं शौर्योत्पादक कृत्यें वर्णन करून कुलाभिमान धरण्यास धैर्य व आवेश आणीत. भाटांमध्यें अनेक प्रकार आहेतः—कंकाळी भाट, मारवाडी भाट, मुसलमान भाट, ब्रह्म भाट, चारण, भारोट, वहीवंचे, वगैरे. यांच्या कवितेंत संस्कृत छंदःशास्त्राप्रमाणें स्वतंत्र छंदोबद्ध पद्यें असतात. भाटांच्या ग्रंथांत पुढील छंद आढळतातः—कुंडली, सवाई, चौपाई, छप्पा, कबीत, छंद, प्रबंध, दोहा, केहवत, गीत, बाणी, वगैरे. फार पूर्वकालापासून सर्व राजांजवळ हे बंदीजन (भाट) असण्याचा परिपाठ दिसतो. पूर्वीच्या तीनही युगांतील राजांजवळ असलेले भाट ग्रंथांतरीं आढळतात. ते हे आहेतः—कृतयुगांत-चंडीजवळ वेलंग व वळास हे दोन भाट होते; व शेषाजवळ भीमसी नांवाचा भाट होता. त्रेतायुगांत-बळिराजाजवळ पिंगल व रामराजाजवळ रंपाळ भारोट असे भाट होते. द्वापरयुगांत–पांडवांजवळ संजय व नैमिषारण्यांत शौनकादिऋषींजवळ सूत हे भाट होते. आणि आलीकडे कलियुगांत–विक्रमराजाजवळ वेताळ, पृथ्वीराजाजवळ चंद भाट, अकबर बादशाहाजवळ गंग भाट[१] असे होऊन गेले. पृथ्वीराज चव्हाण याजजवळ चंद भाट होता, त्याणें प्रस्तुतचा ग्रंथ लिहिला. या ग्रंथास 'पृथ्वीराजरासा' हें नांव असल्याचें वर सांगितलेंच आहे. चंद भाट यास देवीचा प्रसाद असल्यावरून त्यास 'चंद वरदायी', किंवा चंद बरदाई' असें नांव पडलें आहे. 'रासा' ह्मणजे इतिहास; व यावरून 'पृथ्वीराजरासा' ह्मणजे 'पृथ्वीराजाचा इतिहास' असें सिद्ध आहे.

---

१. शिवाजी राजाजवळ भूषण नांवाचा भाट होता. त्यानें 'शिवराजभूषण' नामक शिवाजीचें स्तुतिपर काव्य रचिलें आहे.

४. इतिहासकार लोकांना पूर्वीच्या क्षत्रिय व रजपूत राजांचे इतिहास लिहिण्यास या भाट लोकांचे ग्रंथ बरेच साह्यभूत झाले आहेत. राजस्थान व गुजराथ या प्रांतांचे इतिहास अनुक्रमें कर्नल् टॉड् व मिस्टर फॉर्बस् या दोघां साहेबांनीं लिहिले व त्यांस जी कांहीं माहिती मिळाली ती भाट, भारोट व वहीवंचे लोकांकडूनच मिळाली. ही माहिती मिळविण्याकरितां त्या उभय साहेबांनीं बहुत प्रयत्न केले. भाटांशीं स्नेह संपादून, त्यांस द्रव्य देऊन व त्यांचीं कित्येक मागणीं, मान व सिधे कबूल करून त्यांणीं त्यांजकडून त्यांच्या पाताड्यांची व चोपड्यांची मिळवामिळव केली, व त्यांवरून सदरील 'राजस्थानाचा इतिहास' व 'रासमाळा' हे ऐतिहासिक ग्रंथ लिहिले. फॉर्बस् साहेबानें तर या इतिहासरक्षक भाटांस आपल्याजवळ बाळगलें होतें व त्यांच्याजवळून मिळवामिळव करण्याचें व त्याचें शोधन करण्याचें काम अमदाबादचे प्रसिद्ध दलपतराव कवि यांजकडे सोंपविलें होतें. फॉर्बस् साहेबानें 'गुजराथचा इतिहास' इंग्रजींत लिहिला व पुढें त्याचें गुजराथी भाषांतर झालें. परंतु तो इतर देशी भाषांतून अजून उतरला गेला नाहीं. यावरून आमच्या लोकांस अजूनही किती इतिहासप्रीति आहे हें स्पष्ट होतें. इंग्रजलोक स्वभावतःच शोधक असल्यामुळें त्यांजकडून परिश्रम होऊन प्रांताप्रांतांचे इतिहास लिहिले जातात. तेव्हां आतां ते ते इतिहास देशभाषांतून उतरण्याचें काम राहिलें आहे. पण तेंही कोणाच्यानें होत नाहीं. सरकाराकडून जेवढे ग्रंथ देशभाषांतून उतरले जातील तेवढेच काय ते मिळतात व शाळेंत शिकवितात; परंतु त्यांशिवाय इतर जे अप्रसिद्ध ऐतिहासिक ग्रंथ आहेत त्यांचें ज्ञान इंग्रजी ग्रंथांशिवाय होणें दुरापास्त आहे. ते सर्व जरी नाहीं तरी ठोकळ ठोकळ इतिहासभाग देशभाषांतून उतरले जाणें अत्यंत आवश्यक आहे. या देशांत अनेक भाषा आहेत. त्या सर्वांत तत्तद्भाषाभिमान्यांनीं निवडक निवडक ऐतिहासिक ग्रंथ लिहून इंग्रजींतलें ज्ञान आपल्या लोकांस द्यावें. परंतु एतद्विषयक अभिरुचि आमच्या लोकांत नाहीं व श्रीमान् व ऐपतदार अशा राजे, संस्थानिक व सरदार लोकांत तर ती नाहींच नाहीं. हें कालवैपरीत्याचें दर्शक होय. दुसरे अज्ञान असलेले लोक स्वपराक्रमानें कीर्ति-

मंदिराची एकेक पायरी दिवसेंदिवस चढून वर चाललेले आहेत. आणि भारतवर्षीय श्रेष्ठ, विद्वान्, व अहंमन्य असे आमचे लोक त्या कीर्तिमंदिरापासून च्युत होत आहेत!

५. चंद वरदायी याचे ग्रंथांत त्या कालाप्रमाणें कितीएक दोष आहेत, परंतु त्यांत विशेष आश्चर्य नाहीं. वाल्मीकि, व्यास, वगैरे जे प्राचीन ग्रंथकार झाले, त्यांनीं आपले ग्रंथांतून अद्भुत वर्णनें, अत्युक्ति, देवदानवप्रकरणें वगैरे घालून जसे रसभरित ग्रंथ केले, त्यां-

---

१. गुजराथेंत जे मुसलमान राजे झाले त्यांनीं आपले 'तवारीख अहंमदी' वगैरेसारखे इतिहास लिहिले. परंतु इतिहास ह्मणजे राजे लोकांच्या वंशांचेंच वर्णन नसून त्यांत देश,काल, लोक व त्यांचे आचारविचार, रीति वगैरेच्याही हकीकत असाव्या. त्याप्रमाणें पाहतां 'तवारीख अहंमदी' वगैरे ऐतिहासिक ग्रंथांत तशा प्रकारच्या माहितीचा अभाव आहे. मग त्या इतिहासलेखकांस लौकिकी व्यवहारांत कांहींच लेख्य भाग वाटला नाहीं किंवा कसें, कोण जाणे. पुढें तिकडे दीडशें वर्षें मराठ्यांचें राज्य झालें; परंतु तोही काळ कांहीं मुलुखगिऱ्या करण्यांत व कांहीं त्यांची स्थिरस्थावरता करण्यांत जाऊन बाकी कांहीं राहिला तो जड व मूढपणामुळें नाच, रंग, कुस्त्या, स्वाऱ्या वगैरे पहाण्यांतच गेला. आतां मात्र इंग्रजांचा प्रवेश झाल्यापासून सरस्वती जागृत होऊन तिला देशांत विहार करण्यास निर्बंधता मिळाली आहे. गुजराथेंत फॉर्बस् साहेबासारख्या अभिमानी व देशहितेच्छु लोकांनीं जीं गुजराथप्रांताच्या कल्याणार्थ कृत्यें केलीं, तींच आज सफल होत आहेत. फॉर्बस् साहेबांनींच प्रथम गुजराथेंत छापखाना आणिला व 'गुजराथसोसायटी' नांवाची गुजराथी ग्रंथोत्तेजक मंडळी स्थापन केली. तेणेंकरून आलीकडे तिकडे गुजराथी ग्रंथ मराठी ग्रंथांपेक्षां देखील ज्यास्त प्रसिद्धीस येऊं लागले आहेत. त्याचप्रमाणें गुजराथी जुन्या कविता आणि नवे नवे ग्रंथ यांचा प्रकाश होत जाऊन त्यांचा शाळाखात्यांत विशेष प्रसार होत आहे व त्यांतच वर लिहिलेल्या प्रकारें जुने वंश व प्राचीन इतिहास यांचें ज्ञान प्रसृत होत आहे; अशा प्रकारची चळवळ आपल्या दक्षिणेंत नाहीं. असें कां बरें असावें? मराठीविषयीं आपण अगदींच निरभिमानी असावें काय?

चेंच अनुकरण त्यांचे पुढील कवींनीं व ग्रंथकारांनीं केलें. ह्मणून त्यांचे ग्रंथ टाकाऊ झाले असें नसून, त्यांनीं जे मोठाले उद्योग करून आपआपल्या काळांतील इतिहासांचें वर्णन केलें त्यांतून आपल्याला आज बरीच माहिती घ्यायाला सांपडते. कारण, त्या काळची माहिती मिळविण्यास आपल्याला कांहींच साधनें नाहींत. तेव्हां ह्या कांहीं साधारण उपयोग ह्मणतां येत नाहीं. त्याचप्रमाणें आठशें वर्षांपलीकडील जर कांहीं वृत्त आपल्यास समजून घेणें असेल तर चंद वरदायी याचा 'पृथ्वीराजरासा' याशिवाय दुसऱ्या लेखाचें साधन नाहीं. यास्तव त्या कवीचा ह्या मोठाच उपकार समजावयाचा. शोधपूर्वक व सत्य वृत्तांतच लिहावा ही चाल त्या काळीं कोणासच माहित नसून विलक्षण गोष्टी व अमानुष कृत्यें यांचीं कथानकें लिहून आपल्या कवितेस रस आणावा हीच सर्वांची समजूत असल्यामुळें, व जितक्या अद्भुत वर्णनांनीं व असंभाव्य गोष्टींनीं कोणताही ग्रंथ जास्त भरलेला असेल तितका तो लोकांत विशेष प्रिय होऊन तसल्या कवीस विशेष मान देत ह्मणून, त्या लोकरुचीस अनुसरून कविजनही आपल्या ग्रंथांत रसाविर्भाव ओतप्रोत ओतण्यास कसर करीत नसत. अस्तु.

६. चंद वरदायी याचा ग्रंथ फार मोठा आहे, तथापि रा० रा० आत्माराम केशवजी द्विवेदी यांणीं त्यांतील सारभूत असा एक छोटासा ग्रंथ गुजराथी भाषेत भूज येथें प्रसिद्ध केला. ह्या ग्रंथ कर्त्यानें त्या वेळचे भूजचे दिवाण रावबहादूर मणिभाई जसभाई यांस अर्पण केला आहे. त्याचे आधारानेंच ह्या इतिहास महाराष्ट्रभाषेंत आह्मीं उतरून घेतला आहे. अर्थात् मूळ ग्रंथाशीं ताडून पाहिला असतां ह्या तात्पर्यरूपच आहे. आतां या इतिहासावरून वाचकांस सहज आढळून येईल कीं, सातआठशें वर्षांपूर्वी क्षत्रिय लोकांमध्यें अज्ञान व भोळेपणा फार असून पेशवाईचे अखेरीस आमच्या इकडे शिंदे, होळकर, जयपूरवाले व गाइकवाड यांजमध्यें जितक्या अंशांनीं रहस्य होतें तितक्याच अंशानें त्यांचें आपसांत रहस्य होतें व सर्वदा त्यांची आपसांत फार लाथाळी व तंटेबखेडे चालत असत. त्या काळीं शैव व शाक्त या धर्मांचीं बंडें असून शक्त्युपासकांचे वाममार्ग व बलि-

प्रदानें वगैरेही चालत असत; सती जाण्याचा संप्रदाय प्रचलित होता; व जैनधर्माचाही प्रसार त्या काळीं चांगला होता. राजे फार उन्मत्त, अविचारी, कर्तव्यशून्य आणि अज्ञानी असून त्यांस पराजित करणाऱ्या मुसलमान लोकांविषयीं ते अगदींच गैरमाहितगार होते. त्यांस त्यांचें शौर्य, निश्चय व सिद्धि हीं पाहून मोठा चमत्कार वाटे, व त्यांजवर ईश्वरी कृपा आहे असें वाटून ते त्यांच्या पायां पडत व त्यांस गुरुत्व देत. पराजित झालेल्या लोकांस विजयी लोकांविषयीं अशीच भावना होते. याविषयीं इकडेही नुक्ती इंग्रजी झाली होती तेव्हां लोकांस असेंच वाटत असे. अजमीरचें राज्य खाली करणारे मीरासाहेब व अजमीरास प्रथम झेंडा लावणारे ख्वाजा पीरसाहेब ह्यांचा मान त्या वेळेस फार असून ते वारल्यावर तर त्यांच्या कबरेस अजून हिंदुलोक पूज्य मानतात व नवस करून यात्रा भरवितात.

७. अकबरानें चितोडगड घेतला त्या वेळेस तेथील दरवाजे, दिवे, नगारखाने वगैरे सामान काढून ख्वाजा पीराचे रोजांत नेऊन ठेविलें आहे. तें पाहून लोक अजून देखील धन्यता मानतात. वरील पीराचे मैदानांत दोन चुले घालून त्यांजवर तांब्याचे डेरे ठेविले आहेत. त्यांत सव्वाशें मण तांदूळ शिजतात. सर्व यात्रेकरी लोक तितकें धान्य देऊन त्याचा भात करतात व फकीरांस खैरात वांटतात, अशी जी हल्लीं तेथें चाल आहे ती त्या वेळींही होती. हा पीर सय्यद लोकांच्या ताब्यांत असून त्यास अजून शिंद्यांकडून पंचवीस हजारांची जहागीर आहे; व त्याचप्रमाणें होळकर, गाइकवाड आणि रजपूत राजे यांजकडून गांवनेमणुका व पोषाख मिळतात. या पीरास भोळे लोक मुलें होणें व कोणतेंही संकट दूर करणें याविषयीं नवस करितात, व त्या संबंधानेंही त्या मुसलमानी संस्थानास बरेंच उत्पन्न होतें.

८. तारागड ह्मणून जो रजपुतस्थानांत प्रसिद्ध मजबूत किल्ला आहे त्याचे पायथ्याशीं अजमीर शहर सातान्याप्रमाणें वसलें आहे. हें शहर पृथ्वीराजाची जन्मभूमि ह्मणून प्रख्यात असून, तेथें वरील पीराचें स्थान असल्यामुळें पूर्वीपासून दिल्लीचे बादशाहांची तेथें पैरवी असे व त्या पीरास फारच मानीत असत. अजमीर हें पूर्वी शिंद्यां-

कडे असून तेथें त्यांच्या तोफखान्याच्या वगैरे इमारती आहेत; परंतु हल्लीं तें इंग्रज सरकारच्या ताब्यांत असून तेथें त्यांचा कमिशनर असतो. राजपुतान्यांत इंग्रजांच्या ताब्यांत येवढेंच शहर आहे. हल्लीं हें शहर राजपुताना स्टेट् रेल्वेवर अमदाबाद व आग्रा या मार्गामध्यें आलें आहे; व यामुळें तें, त्या मार्गानें जाणाऱ्या पुष्कळ प्रवाश्यांचे दृष्टीस पडण्यासारखें आहे. वर जे दोघे अजमीर काबीज करणारे प्रसिद्ध सरदार सांगितले, त्यांतील मीराची कबर तारागडावर असून ख्वाजा पीराची खालीं अजमीर शहरांत आहे, अजमीरापासून तीन कोसांवर पुष्करक्षेत्र असून तेथें ब्रह्मदेवाची मूर्ति आहे. या क्षेत्रास बहुत यात्रेकरू जातात. तेव्हां वरील पीराचे भक्त सय्यद लोक प्रसाद घेऊन तेथें त्यांस देण्याकरितां येतात, व क्षेत्रींच्या ब्राह्मणांप्रमाणें दक्षिणा मागून त्यांजकडून पीराचें दर्शन करवितात. त्याचप्रमाणें दर्शनास आलेल्या यात्रेकरूंचीं नांवें वहीवर लिहून घेतात. इतकेंच नव्हे, तर हल्लीं अशी चालच पडून गेली आहे कीं, अगोदर पीर येऊन मग पुष्करराजतीर्थ येतें, ह्मणून यात्रेकरू अगोदर पीराचें दर्शन घेतात आणि मग त्या तीर्थास जातात. सारांश, जे लोक जिंकिले जातात त्यांजकडून जिंकणारांशीं अशाच लीला चालतात, व ते जिंकणारांस महान् सामर्थ्यवान् समजून ते जीवंत असतां व मेल्यावरही त्यांच्या भजनीं लागतात. अस्तु. आतां याचे पुढें हा प्रस्ताव पुरा करूं. कारण, मुख्य इतिहासावरून इतर अनेक गोष्टी कळतीलच.

९. आपल्या इकडे प्राचीन इतिहास लिहिलेले नाहींत हें मोठें व्यंग आहे. व इतका चौकसपणा कोणासच नव्हता हें मोठें आश्चर्य आहे. या देशांत प्रथम इस्राएल लोक वस्ती करण्याच्या उद्देशानें आले. त्यानंतर पारशी, त्यानंतर मुसलमान, त्यापुढें फिरंगी (पोर्तुगीज), व त्यानंतर इंग्रज, याप्रमाणें एकामागून एक परदेशस्थ लोक वस्तीच्या व व्यापाराच्या उद्देशानें इकडे आले. त्यांनीं आपापल्या उद्देशाप्रमाणें व्यापार, रोजगार व राज्यें केलीं. परंतु हे कोण, कोठून व कोणत्या उद्देशानें आले, त्यांची रीतभात काय, व त्यांचे आचारविचार कसे काय आहेत, याविषयीं या देशांतील लोकांनीं क्षणभरही विचार

केला असेल किंवा त्यांची किंचित् तरी माहिती मिळविली असेल असें दिसत नाहीं. परंतु उलट, या देशांतील लोकांचे वाडवडील कसे होते, त्यांचे ग्रंथ व शास्त्रें कशीं आहेत इत्यादि गोष्टी कोणास पाहणें झाल्या तर त्याकरितां परदेशस्थ लोकांनीं मोठ्या परिश्रमानें जे शोध, तपास, माहितगाऱ्या व आधार मिळवून प्रसिद्ध केले आहेत त्यांचीं पुस्तकें शोधावीं लागतात. ऐतिहासिक ग्रंथ बघणें झालें तर **टॉड्**, **फॉर्बस्**, **ग्र्यांट्‌डफ्**, **एल्फिन्स्टन्**, **माल्कम्** वगैरे लोकांनीं मोठे श्रम करून लिहिलेलीं पुस्तकें पहावीं लागतात; व धर्मसंबंधीं संस्कृतांतील संगतवार माहिती बघणें तर **विल्सन्**, **मोक्ष्‌मुल्लर्**, **मॉनियर विल्यम्स्** इत्यादि विलायती पंडितांचे ग्रंथ पहावे लागतात. याशिवाय पूर्वे इतिहास मिळविण्याला दुसरें साधन नाहीं. यापेक्षां तें आमच्या लोकांच्या उदासीनतेचें सबल प्रमाण दुसरें कोणतें असावें? तेव्हां, जुने इतिहास आपल्या महाराष्ट्र भाषेंत आणवतील तितके आणावे हें जें आमचें ह्मणणें आहे त्या ह्मणण्यापैकींच हा प्रस्तुतचा अल्प प्रयत्न आहे. येणेंकरून पूर्णत्वें जरी नाहीं, तरी अंशतः प्राचीन इतिहासाचें उद्धरण झाल्यासारखें होईल असें वाटतें. या इतिहासांतील अत्युक्ति, असंभाव्य वर्णनें वगैरे जीं अगदीं नाइलाजानें गाळतां आलीं नाहींत तीं तशींच राखून ठेवावीं लागलीं. तरी त्यांवरून ऐतीहसौरस्य नाहींसें होईल असें वाटत नाहीं. पूर्वींच्या चरित्रवर्णनाच्या रीति व हल्लींच्या चरित्रवर्णनाच्या रीति ह्या परस्पर अत्यंत भिन्न आहेत. तेव्हां त्याप्रमाणें सत्य व इष्ट भाग इतिहासप्रियांनीं यांतून घ्यावा ह्मणजे कर्त्याच्या श्रमांचें साफल्य होईल.

**लोकहितवादी.**

# पृथ्वीराज चव्हाण
# याचा इतिहास.

## प्रकरण पहिलें.

क्षत्रियवंशाचा प्राचीन इतिहास.—हस्तिनापूरचा राजा अनंगपाळ. पृथ्वीराजाची मातृपीठिका.—चव्हाणवंश. पृथ्वीराजाची पूर्वपीठिका.—पृथ्वीराजाचा जन्म. चव्हाण व राठोड या उभय कुलांत कलह.—दिल्लीशहर.—नागोरचा खजिना.—पृथ्वीराजाचा विजय.

सूर्यवंशांत प्रथम **इक्ष्वाकु** राजा **अयोध्येस** झाला. त्याचे पुढें सत्तावन्नावे पिढींत कुलभूषण राजा **रामचंद्र** झाला. **रामचंद्रानंतर** छप्पन्न राजपुरुष झाले व **जयपूर**, **उदेपूर** व **जोधपूर** येथील राजे त्यांपैकींच आपण आहोंत असें ह्मणवितात. **जयपूरचे** राजे **कच्छवाह**वंशीय असून पूर्वी ते **नरवरास** होते; **उदेपूरचे** राजे **सिसोदे**वंशीय असून ते मूळचे **वल्लभीपुरास** होते; आणि **जोधपूरचे राठोड**वंशीय राजे **कन्नोज** येथें होते; अस्तु. **इक्ष्वाकूची** बहीण **इला** नामक होती ती **चंद्रपुत्र बुधास** दिली होती. तिच्यापासून पुढें **चंद्र**वंश चालला. **बुधाचा** पुत्र **पुरूरवा**, त्याचा **ययाति** व त्याचे तीन पुत्र—**उरु**, **पुरु**, व **यदु**. यांपैकीं **पुरूच्या** सत्ताविसावे पिढींत **हस्ती** राजा झाला. याणेंच **हस्तिनापुर** वसविलें. **हस्तिराजानंतर** बाविसावे पिढींत **पांडवांमध्यें युधिष्ठिर** राजा झाला. तो **भारती** युद्धांत विजयी झाल्यावर त्याणें **इंद्रप्रस्थाचा** किल्ला बांधिला. ही **पुरूच्या** वंशाची गोष्ट झाली. इकडे **यदुवंशांत** एकावन्नावे पिढीस **कृष्ण** व **बलराम** हे राजे झाले, व त्यांणीं आपली राजधानी **गुजराथेंत द्वारका** बेटावर केली. हल्लींचे **जसलमीरचे भाटीवंशाचे क्षत्रिय** राजे, आणि **कच्छचे जाडेजे** व **चूडासमे** हे राजे आपल्यास **कृष्णवंशीय** ह्मणवितात. **युधिष्ठिराचे** वंशांत तीस पिढ्यांपर्यंत **इंद्रप्रस्थ** येथील गादी चालली. त्यांतील शेवटचा राजा **क्षेमराज** हा फार आळशी व मि-

जासी निघाल्यामुळें त्याचा प्रधान **विसर्व** यास संधि मिळून त्याणें त्यास मारून इंद्रप्रस्थाची गादी घेतली. त्यापुढें **विसर्व** याचे अडतीस पिढ्यांनंतर राजा **विक्रमादित्याचा** उदय झाला. वरील अडतिसावे पिढीचा राजा **राजपाळ** ह्मणून होता, त्यास **कमाऊंचा** राजा **सुखवंत** याणें मारून इंद्रप्रस्थाचें राज्य बळकावलें होतें; व त्यापासून **तुवरवंशीय** **विक्रमादित्यानें** वर लिहिल्याप्रमाणें तें राज्य आपलेकडे घेतलें. तेव्हांपासून एकुणिस पिढ्यांपर्यंत ही राजधानी **तुवरवंशाकडे** होती. या पिढींतील शेवटचा राजा **अनंगपाळ** हा राज्य करीत असतां, ह्मणजे, **विक्रम संवत्** १२०० मध्यें, **मुसलमान** राजांकडील लोक फकीर, पीर, जासूद, सौदागर, वगैरे रूपानें **हिंदुस्थानप्रांतीं** फिरूं लागले, आणि पुढें त्यांणीं मसलती करून इ० स० ११९३ मध्यें मोठ्या गर्दीनें **दिल्ली** घेतली. त्या वेळीं अजमीर येथें **सोमेश्वर**, **मंडोरास** **नहरराय**, **चितोडगडावर** **समरसिंह**, **जसलमीर** येथें **भोजदेव**, **कनौज** येथें **जयचंद**, **अबूगडावर** **जैत प्रमार** व **अन्हिलपुर (पट्टण)** येथें **चालुक्य** वंशांतील **गुर्जराधिपति** **भोळा भीम** याप्रमाणें राज्य करीत होते.

**अनंगपाळ** यास दोन मुली होत्या. त्यांतील **कमला देवी** ही **अजमीर** ऊर्फ **द्रोणगिरि**[1] येथील **सोमेश्वर** राजास दिली होती, व दुसरी मुलगी **कनोजचा** राजा **विजयपाळ** यास दिली होती. ह्या दोघी मुलींस अनुक्रमें **पृथ्वीराज चव्हाण** व **जयचंद** असे दोन पुत्र होते. पुढें **अनंगपाळानें** वृद्धापकाळ झाला ह्मणून **बद्रिकाश्रमीं** राहून वानप्रस्थाश्रम स्वीकारण्याचें मनांत आणून आपला दौहित्र **पृथ्वीराज चव्हाण** यास आपले पश्चात् राज्याधिकृत करावें असा निश्चय केला. या संबंधानें त्याणें आपल्या नातवास जें पत्र लिहिलें, तें **चंद भाट** याणें पुढें लिहिल्याप्रमाणें **शार्दूलविक्रीडित** छंदांत वर्णिलें आहे:—

**“स्वस्ति श्री अजमेर द्रोणदुरगं राजाधिपो राजनं**
**पुत्रीपुत्र पवित्र पंथय धनो छत्रीस वंसावनं ।**

---

१. कौरवपांडवांच्या काळीं अजमीर हें द्रोणाचार्यांकडे असल्यामुळें त्यास ‘द्रोणगिरि’ अथवा ‘द्रोणदुर्ग’ असें ह्मणत असत.

**मा वृद्धाय सुवृद्ध तस सरणं बद्रीनिमित्तं तनं**
**आ भूमी य हयं गजं च सकलं संकल्पिता तर्पयं ॥**

ह्मणजे:—"स्वस्ति श्रीअजमीर ऊर्फ **द्रो**णदुर्ग येथें राज्य करणाऱ्या छत्तीस राजकुळांत पवित्र अशा प्रिय दौहित्रास—माझी वृद्धावस्था झाल्यामुळें मी **ब**द्रिकाश्रमीं तपस्याचरणार्थ जाणार आहें. तर ही भूमि, अश्व, गज आणि इतर सर्व कांहीं तुझ्या नांवानें अर्पण केलें आहे; तें तूं संभाळावें."

वरीलप्रमाणें आजोबांचें पत्र आल्यावर **पृ**थ्वीराजानें त्याचा आदर करून त्याप्रमाणें **इं**द्रप्रस्थाचें राज्य स्वीकारलें.

**अ**जमीरच्या **च**व्हाणवंशांत **वी**सलदेव नांवाचा मोठा प्रख्यात राजा झाला. त्याचे कारकीर्दींत **मु**सलमान **हिं**दुस्थानांत येऊं लागले. तेव्हां त्यांशीं लढण्याकरितां सर्व राजांस एकत्र होण्याविषयीं त्यानें आमंत्रण केलें. परंतु त्यांत **गु**जराथचा राजा **भी**मदेव ह्मणून होता तो मिळाला नाहीं. ह्मणून त्याजवर **वी**सलदेवानें स्वारी करून त्याचा पराजय केला व त्याजपासून खंडणी घेतली. **वी**लसदेवाची आणि **भी**मदेवाची जेथें लढाई होऊन **वी**सलदेवास यश मिळालें तेथें **वी**सलनगर ह्मणून एक शहर वसलें, तें अद्यापि आहे. **वी**सलनगर येथील ब्राह्मण आपल्याला '**वी**सलनगरी **ना**गर' ह्मणवितात. हे **व**ड-नगरी नागरांप्रमाणें आहेत. या **वी**सलदेवासंबंधीं असें एक ऐतीह लिहिलें आहे कीं, तें केवळ पौराणिकी घाटाचें आहे असें वाटल्या-वांचून राहत नाहीं; व त्याशीं या इतिहासांतील नायकाचा व ह्या इतिहास लिहिणाऱ्या **चं**द भाटाचा संबंध दाखविला आहे. तें वृत्त असें:—**वी**सलदेवानें एका **ना**गकन्येशीं विवाह लाविला असून, तो तिजवरच लुब्ध होऊन त्याच्या इतर राण्यांकडे त्याचा प्रेमभाव कमी झाला; व त्यामुळें त्या राण्या राजावर नाखुष होऊन त्या सवतीचा मत्सर करूं लागल्या. हें पाहून **ना**गकन्येनें त्याला एक मणि दिला. त्या **ना**गकन्येचा महाल एका तळ्यांत असे. त्यामध्यें पाण्यांत बुडून जाण्यास तो मणि जवळ असल्यानें त्या राजास सुघड होई. पुढें राजाला पाण्याच्या तळीं कसें जातां येतें याचा शोध ठेवून एके दिवशीं त्या राण्यांनीं तो मणि

चोरून ठेवून जाळून टाकिला. तेव्हां अर्थात् त्याचें जलांतर्भागीं जाणें बंद झालें, व त्यामुळें तो वेडावून इतस्ततः भ्रमण करूं लागला. या वेडांत त्यानें एका ऋषिकन्येस स्पर्श केला. तेव्हां तिणें त्याला शाप दिला कीं, 'तूं राक्षसयोनि पावशील.' त्या शापाप्रमाणें **वी**सलदेव राक्षस होऊन मनुष्यें भक्षण करूं लागला. या त्याच्या मनुष्यभक्षक कृत्यानें लौकरच वीसलनगर उजाड होऊन उद्वस्त पडलें. **वी**सलदेव यास **सा**रंगदेव नांवाचा एक पुत्र होता. त्याचा **अ**नहदेव ह्मणून पौत्र होता. हल्लीं **अ**जमीर येथें **अ**नहसागर नांवाचा जो तलाव आहे तो **अ**नहदेव याणेंच बांधिला आहे. **अ**नहदेवाचा पुत्र **ज**यपाळ, त्याचा **आ**नंददेव आणि त्याचा मुलगा **सो**मेश्वर. या **सो**मेश्वराचे कारकीर्दींत एक **ब्रा**ह्मण, बायकोच्या द्वाष्टपणानें त्रस्त होऊन तो वरील राक्षसयोनींत असलेल्या **वी**सलदेवाकडे जाऊन ह्मणाला कीं, 'मला खाऊन टाक.' राक्षसानें त्याला विचारलें कीं, 'तुझ्या जीवाचा तुला येवढा कंटाळा कशानें आला?' तेव्हां **ब्रा**ह्मणानें, 'आपण दरिद्री असून तत्संबंधानें बायको फार द्वाष्टपणा करिते, यामुळें त्रस्त होऊन मला जीवाची आशा नाहींशी झाली आहे,' असें सांगितलें. ती सर्व हकीकत ऐकून राक्षसानें त्याचें सांत्वन करून त्याला विपुल द्रव्य दिलें, आणि त्यास परत घरीं पाठवून 'बायको आणि तूं सुखानें संसारसुख भोगा' असें सांगितलें. याशिवाय त्या राक्षसानें **ब्रा**ह्मणाबरोबर **सो**मेश्वरराजाला असा निरोप पाठविला कीं, 'तुझ्या हातून माझा उद्धार होणार आहे परंतु मला मारून तूं खाल्लें पाहिजे.' आणि त्याणें त्याला असें सांगितलें कीं, 'मी राक्षस असल्यामुळें त्याच्यानें मला खाववणार नाहीं, ह्मणून मी डुकराचें रूप घेऊन येतों. तेव्हां माझी पारध करून त्यानें माझें मांस खाऊन टाकावें व जे माझें मांस खातील त्यांस मोठे पराक्रमी पुत्र होतील.' हा निरोप त्या **ब्रा**ह्मणानें **सो**मेश्वरराजास कळविल्यावर त्याप्रमाणें त्यानें शिकारीची तयारी करून

१. असल्या अद्भुत गोष्टी हिंदुस्थानांत बहुत चालत असून याचा कित्ता पुराणांनीं घातला व तोच पुढील कवींनीं वळविला हें पुनः पुनः सांगणें नकोच.

त्या सूकररूप धारण करणाऱ्या **वी**सलदेवराक्षसास मारून त्याच्या मांसाचें सर्व शिकारी मंडळीनें भोजन केलें. त्या मंडळींत **चंद भाटा**चा बापही होता. पुढें त्या सर्वांस पुत्र झाले. त्यांत राजाला पुत्र झाला, तो या इतिहासांतील नायक **पृ**थ्वीराज, व **भा**टास पुत्र झाला तो हा इतिहास लिहिणारा **चंद भाट**. याप्रमाणें पराक्रमी व कीर्तिमान् पुत्र झाले. आणि इतर सरदारांस जे पुत्र झाले, ते **पृ**थ्वीराजाचे सोळा **सा**मंत ह्मणजे मांडलिक राजे झाले. **चं**द यास **दे**वीचा वर असल्यामुळें त्याला '**चंद व**रदायी' हें नांव पडल्याविषयीं वर लिहिलेंच आहे.

**पृ**थ्वीराजाचा जन्म विक्रम संवत् १२१५ ह्मणजे इ० स० ११५९ मध्यें झाला. त्यास **अ**नंगपाळानें दत्तक घेऊन आपल्या राज्याचा वारसा दिला व त्याप्रमाणें **पृ**थ्वीराजही त्या राज्यावर अधिष्ठित झाला खरा. परंतु येणेंकरून **अ**नंगपाळाचा दुसरा दौहित्र व **पृ**थ्वीराजाचा मावसभाऊ जो **क**नौज येथील **ज**यचंद, त्यास विषम वाटून 'आजोबांनीं एकट्या **पृ**थ्वीराजासच आपल्या राज्याचा मालक केलें हें बरोबर नाहीं; मीही **पृ**थ्वीराजाप्रमाणेंच **अ**नंगपाळाचा दौहित्र असल्यामुळें आजोबांच्या राज्यांत माझाही विभाग असला पाहिजे,' असें तो ह्मणूं लागला; व यामुळें पुढें **च**व्हाण व **रा**ठोड या उभय कुलांत कलह माजून त्याचा अतिशोच्य परिणाम झाला. ह्मणजे, या कलहामुळें आणि आपसांतील मात्सर्यानें **क्ष**त्रियवंशाचें **इं**द्रप्रस्थ येथील राज्याधिकारित्व अजीवात नष्ट झालें. तें पुनः कोणासही मिळालें नाहीं.

**अ**नंगपाळ राज्य करीत असतां **इं**द्रप्रस्थास '**दि**ल्ली' हें नांव मिळालें होतें. या नांवाविषयीं कांहीं चमत्कारिक ऐतीह **चं**द याणें वर्णिलें आहे. **अ**नंगपाळानें जेव्हां हें शहर वसविलें तेव्हां जोश्यानें मुहूर्त दिला त्याप्रमाणें घरांच्या पायांचे दगड रोंविले. त्या वेळीं राजा ह्मणाला, 'हे दगड कितीसे खोल रोंविले आहेत?' तेव्हां **ब्रा**ह्मण ह्मणाला, 'हे **शे**षाच्या मस्तकावर बसले असून ते कायम झाले. ही **तु**वरवंशाची राजधानी कधींही जाणार नाहीं.' राजाला आश्चर्य वाटून त्यानें विचारलें, 'तुह्मी ह्मणतां याप्रमाणें **शे**षाच्या मस्तकापर्यंत हे दगड पोंचले हें कशावरून? या दगडाखालीं **शे**षाचें मस्तक आलें

आहे यास प्रमाण काय?' जोशी ह्मणाला, 'हा दगड काढा; त्याबरोबर जर रक्त आलें तर माझें ह्मणणें खरें, आणि तसें न आलें तर माझें ह्मणणें खोटें असें समजावें.' तेव्हां अनंगपाळानें त्या ह्मणण्याची प्रतीति पाहण्याकरितां एक रोंवलेला दगड उखळविला. तों जोश्यानें सांगितल्याप्रमाणें त्याबरोबर खरोखरच रक्त आलें. परंतु त्यावर ब्राह्मण ह्मणाला, 'आता माझा मुहूर्त बिघडला, तेव्हां हें शहर वसविण्यास हा योग्य काळ नाहीं.' पण राजानें तें कांहीं मनांत न आणितां तसेंच शहर बांधिलें. त्यांत राजानें मुहूर्ताची वेळ 'ढिली' केली ह्मणून त्या शहरास 'दिल्ली'[1] हें नांव पडलें.

---

१. हल्लींच्या दिल्ली शहरास 'शाहजनाबाद' असें नांव आहे. ह्मणजे, प्रस्तुतची दिल्ली औरंगेजब बादशहाचा बाप शाहजहान याणें वसविली आहे. शहाजहानाचे पूर्वींच्या बादशाहांनीं जीं शहरें व किल्ले बांधिले, ते हल्लींच्या दिल्लीच्या लगतच आसपास आहेत. पुराणी दिल्ली ह्मणून जें शहर आहे त्याजमध्यें पृथ्वीराजाचा वाडा वगैरे प्राचीन व प्रसिद्ध इमारती आहेत. या पुराण्या दिल्लींत बादशहाच्या वंशांतील पुरुषांचीं कबरस्थानें आहेत; व सर्व बादशहांचीं प्रेतें तेथेंच आणून पुरलीं असून त्यांवर मोठमोठाल्या कबरा बांधिल्या आहेत. या कबरांत दिल्लीचा अंध बादशाहा शाहअलम याची जी कबर आहे ती फारच मोठी असून प्रेक्षणीय आहे. या कबरस्थानाजवळच राजवाड्यावर कुतुबमिनार ह्मणून एक मोठा व उच्च जयस्तंभ आहे. आपल्या इकडे मुंबईच्या युनिव्हार्सिटीचा स्तंभ फार उंच असें ह्मणतात. पण वरील कुतुबमिनार हा जयस्तंभ मुंबईच्या युनिव्हर्सिटीचे स्तंभापेक्षां दुप्पट उंच असून त्याला तीनशें पाहिऱ्या आहेत. या कुतुबमिनाराचे इमारतीजवळच आदिमातेचें देऊळ आहे. या देवळापुढें एक लोखंडी खांब उभा केलेला असून त्याजवर कांहीं अस्पष्ट लेख आहे. ह्या देवळाचे आलीकडे तघलखाबादचा व फिराघसरचा असे दोन मोठाले किल्ले आहेत. फिराघसर किल्ल्याजवळच पूर्वीं राजा मान याणें बांधलेली वेधशाळा पडक्या स्थितींत आहे. या वेधशाळेस दिल्लीचे लोक 'जंतरमंतर' ह्मणतात. यांत आश्चर्य नाहीं. मुंबईस कुलाब्यावर जी वेधशाळा आहे तिलाही तेथील लोक 'तांबेका बंगला' असें ह्मणतात. अस्तु. जेथें पुराणी

नागोराजवळ खट्टुपूर ह्मणून एक गांव आहे. तेथें फारा दिवसांचा जुना खजिना असल्याबद्दल पृथ्वीराजास बातमी लागली. यावरून त्यानें त्या खजिन्याचा शोध केला. त्या खजिन्यावर एक पुतळी बसविली असून तिच्या पायथ्याशीं पुढें लिहिलेलीं अक्षरें लिहिलीं होतीं:—

**"शिर कट्टे धन संग्रहे, शिर सज्जे धन जाय।"**

ह्मणजे:—"शिर कापलें तर धन मिळेल; शिर शाबूद राखिलें तर धन जाईल."

हा लेख पाहून पृथ्वीराजानें आपला दिवाण कयमाष ह्मणून होता त्यास विचारिलें कीं, 'आपलें शिर देऊन हें द्रव्य कसें घ्यावें?' तेव्हां कयमाषानें सांगितलें कीं, 'या लेखाचा अर्थ आपलें शिर द्यावयाचें असा नसून या पुतळीचें शिर उडवावें आणि द्रव्य घ्यावें असा आहे. दिवाणजीचें हें ह्मणणें राजास मान्य होऊन त्याप्रमाणें त्यानें त्या पुतळीचें शिर उडविलें. तेव्हां तिच्या खालीं असलेला सर्व खजिना त्यास मिळाला. त्यांत सत्तर लक्ष मोहरा होत्या.

पृथ्वीराजास जो हा मोठा लाभ झाला त्याची स्पर्धा धरून व या योगानें पृथ्वीराज हा शिरजोर व जबरदस्त होईल ही भीति बाळगून कनौज व पट्टण येथील राजांनीं चव्हाण राजास नष्टप्रभ करण्याकरितां गिझनीचा मुसलमान राजा शाहाबुद्दीन गोरी याजकडे वकील पाठवून त्याला आपले साह्यास बोलाविलें; व त्याप्रमाणें तोही यांचे साह्यास आला. तेव्हां पृथ्वीराजानें आपला मेहुणा चितोडचा राजा समरसिंह रावळ याची मदत घेऊन वरील दोन्ही राजांचा पराभव करून शाहाबुद्दीनास तर कैद केलें. परंतु पुढें त्याजकडून आठ हजार घोडे खंडणी घेऊन त्यास बंधमुक्त केलें. या युद्धांत जय झाल्यामुळें पृथ्वीराजानें आपल्या सरदारांस बहुत द्रव्य व पुष्कळ घोडे दिले; व त्याप्रमाणें त्याचा मुख्य साह्यकर्ता जो त्याचा मेहुणा त्यालाही तो देऊं लागला. परंतु त्याणें कांहींच घेतलें नाहीं. हा समरसिंह रावळ मोठा

---

दिल्ली असून जुना राजवाडा आहे, त्याच बाजूला तुवरांची दिल्ली असून त्याचें पुढें मुसलमानांनीं कबरस्थान केलें असावें असें वाटतें.

शिवभक्त असून तो नेहमीं भस्म व रुद्राक्षमाला धारण करी, व यावरून त्याला 'जोगींद्र' (योगींद्र) असें ह्मणत. या विजयापासून **समरसिंह रावळ** व **पृथ्वीराज** यांचें फारच मित्रत्व जमलें व तेव्हांपासून ते अत्यंत ऐक्यतेनें राहूं लागले.

---

## प्रकरण दुसरें.

चामुंडराय.—रोशन अलीचीं अद्भुत कृत्यें.—मीरासाहेबाची तयारी.—मीरा व त्याचे लोक, हिंदुस्थानांत येतात.—खिंग नांवाचा घोडा.—मुसलमानांची लढाईची उद्युक्तता.—चामुंडरायाचा प्रयत्न व सिद्धि.—चामुंडरायाची प्रतिज्ञा.—चामुंडरायाचा विजय.—ख्वाजा पीराचें हिंदुस्थानांत आगमन.—ख्वाजा पीराशीं संधि करण्यास चंद भाट जातो.—पृथ्वीराजाचें अजमीराहून प्रयाण व अजमीरावर मुसलमानांचा ताबा.

**पृथ्वीराजाचे** सोळा **सामंत** (मांडलिक) राजे मित्र होते. त्यांणीं **अजमीरचे तारागडावर** प्रतिमहिन्याचे वद्यपक्षीं मोठी रोषनाई करण्याचा परिपाठ घातला होता. या रोषनाईचा उजेड इतका मोठा व दूरवर जाई कीं, **मक्केस पीर मीरासाहेब** राहत होता त्याचे दृष्टीस तो पडला. याविषयीं **चंद भाटानें** असें ह्मटलें आहेः—

**"सातकोशको दुग हे, ता पर जरत मसाल ।**
**सो देखी मीरां तहां, अर उर ऊठी झाल ॥"**

ह्मणजेः—"सात कोश लांब किल्ला आहे, त्यावर मशाल जळते ती पाहून **मीराच्या** मनांत त्वेष उत्पन्न झाला."

हा उजेड कसला ह्मणून चौकशीकरितां **पीर मीरासाहेब** याणें आपला चेला **रोशन अली** यास अवलियाचे वेषानें **अजमीरास** जाण्यास सांगितलें. तेव्हां त्या चेल्यानें, त्याजवळ असलेली 'पवनगुटिका' तोंडांत धरून उड्डाण केलें; तों चार घटकांत तो **अजमीरास** येऊन पोहोंचला व तेथील रोषनाईचा वृत्तांत सर्व समजून घेऊन पुनः **मक्केस** जाण्याकरितां परतला, परंतु जातांना **अजमीरच्या** लोकांस कांहीं चमत्कार दाखवावा असें त्याचे मनांत येऊन तो **अनहसागर** नामक तेथील तलावाचे दरवाजांत गजचर्म पांघरून व हातांत एक

माला घेऊन कलमा पढत बसला. सकाळीं लोक उठून तलावावर जाऊं लागले तों दारांत हा **यवन** धुणी लावून बसल्यामुळें जाण्यायेण्याला वाट नाहीं असें त्यांस दिसलें. पुढें कांहीं वेळानें ही गडबड सर्व शहरभर पसरली. **पृ**थ्वीराजाचा एक **चा**मुंडराय नांवाचा **साम**ंत व मेहुणा एका हातांत पूजेचें सामान, '**चं**डिपाठा'चें पुस्तक आणि एका हातांत तरवार घेऊन आला. त्याचा असा नियम होता **कीं,** प्रत्यहीं **दे**वीचे देवळांत जाऊन **चं**डीचा पाठ वाचावा व एक टोणगा बळी द्यावा. या **चा**मुंडरायाचा आहार व पराक्रम 'भारतां'तील **भीम**सेनासारखाच होता. त्याविषयीं **चंद भाट** असें लिहितोः—

**"पिये दूध मण पंच शेर पेंतीश स सक्कर।**
**अन्न नव ताकडी, बळी एक मोटो बक्कर ॥**
**काळकूट त्रय शेर, सवा मण घृत सुपोषन।**
**कस्तूरी इक शेर, शेर दो केशर चोषण ॥**
**मण चार दहीं महिषी तरन, भोगराज मटकी भरे।**
**सवा प्होर दिन चढतहीं, सीरामणी चामुंड करे ॥"**

ह्मणजेः—"पांच मण दूध, पस्तीस शेर साखर, अन्न नऊ पांसऱ्या (४५ शेर), एक मोठा बळकट बकरा, तीन शेर अफू, सव्वा मण पौष्टिक तूप, एक शेर कस्तूरी, दोन शेर केशर, चार मण महिषीचें दहीं, याप्रमाणें आहार सवा प्रहर दिवस चढला ह्मणजे **चा**मुंडराय करीत असे."

असा हा **चा**मुंडराय त्या फकीराजवळ येऊन त्यास ह्मणाला, 'तूं **म्लें**च्छ असून येथें आह्मां लोकांचा रस्ता अडवून कां बसलास?' त्यावर फकीरानें त्याचा, 'तूं **का**फर आहेस' असें ह्मणून निषेध केला. त्यामुळें **चा**मुंडरायानें सक्रोध होऊन तरवार उपसली तेव्हां तो फकीर आपली धुणी वगैरे सोडून पळून गेला, तो दुसरे दिवशीं बाजारांत पुनः धुणी पेटवून बसला. तिकडून चारशें गौळणी डोक्यांवर दह्याचीं मडकीं घेऊन राजवाड्यांत चालल्या असतां या फकीरानें त्यांचे जवळून एक मडकें विकत घेतलें व धुणींत एक ढलपा टाकून चट्कन् दोन मोहरा काढून त्या मडक्याची किंमत दिली. परंतु त्याणें मडक्यांत बोट घालून दहीं चाटून पाहिलें तों तें त्यास आंबट लागल्यामुळें तो, 'तसलें दहीं मला नको' ह्मणून ह्मणाला. पण त्या गौळणी

तशाच पुढें चालल्या. तों **रो**शन **अ**ल्लीचे मंत्रसामर्थ्यानें त्यांचीं वस्त्रें एकाएकीं गळून पडलीं. त्याबरोबर सर्व गौळणी खालीं बसल्या व त्या लगबगींत त्यांच्या डोक्यांवरचीं मडकीं भडाभड खालीं पडून फुटलीं व दहीं वायां गेलें. त्यामुळें राजवाड्यांत दह्याचा बोभाट होऊन मोठी गडबड झाली. तेव्हां **रा**मराय **गु**जर व **धीर पुं**डीर या नांवाचे दोघे **सा**मंत याबद्दलचे तपासास निघाले. तों, **चा**मुंडरायानें ज्या फकीरास हांकून दिलें तोच ही करामत करीत बसला आहे असें त्यांस आढळलें. नंतर त्यांणीं त्याच्या मुसक्या बांधून राजाकडे नेलें. राजानें हुकूम केला कीं, 'ज्या बोटानें याणें दह्याच्या मडक्यांतून दहीं घेऊन चाटिलें तें बोट कापून टाकावें.' तेव्हां तो फकीर ह्मणालाः—

**"काटंत मेरी अंगुली, तुटंत तेरी बिंटुली।"**

ह्मणजेः—"माझें बोट तूं कापतोस, पण तुझी **बिंटु**ली (**ता**रागड) किल्ला तुटून पडेल!"

परंतु त्याच्या या बोलण्याकडे लक्ष्य न देतां त्याचें बोट कापलें. तों त्याचा तुकडा उडून **म**क्केस जेथें **मी**रासाहेब बसला होता त्याचे पुढें जाऊन पडला; व त्याचे मागून **रो**शन **अ**ल्लीहि **अ**जमीराहून जो उडाला तो **मी**रासाहेबाजवळ येऊन पोंचला. नंतर तो **मी**रासाहेबास ह्मणाला कीं, 'माझी शत्रूनें अंगुळी तोडिली, परंतु त्याचा **ता**रागड तोडला जाईल ह्मणून जें मी प्रतिज्ञापूर्वक बोललों तें खरें झालें पाहिजे.' मग **मी**रासाहेबानें आपल्या सर्व अवलियांस बोलावून आणून लढाईची तयारी करण्यास सांगितलें; आणि आपण रात्रीं स्मशानांत जाऊन अनुष्ठान करण्यास बसला. तेव्हां त्या अनुष्ठानाच्या प्रभावानें त्यास **खिंग** नांवाचा एक घोडा, एक तरवार व एक कट्यार अशा तीन जिनसा एकाएकीं आकाशांतून प्राप्त झाल्या![1]

---

१. नवीन इतिहासज्ञांस ही मोठी चमत्कृति वाटेल; व ही गोष्ट चमत्कारासारखीही खरी. परंतु असल्या अद्भुत गोष्टी वर्णन करण्याची पूर्वींच्या कवींची रीतच होती असें उपोद्घातांत सांगितलेंच आहे. 'रामायणां'त इंद्रजिताच्या तपश्चर्येनें अग्निकुंडांतून दिव्य रथ निघाल्याची गोष्ट सर्वांस माहीत आहेच, व त्याच नमुन्यावर हें वर्णन आहे.

या दिव्य वस्तु घेऊन **मीरा**साहेब त्या अवलियांबरोबर लढावयास जाण्यास उद्युक्त झाला. या वेळीं **मीरा**साहेबांचें लग्न ठरलें असून त्याकरितां त्याचे इष्टमित्र व आप्तसोयरे जमले होते. त्यांत **मीरा**चा मामा **ख्वा**जा **पीर** याणें त्या लग्नाप्रीत्यर्थ **मीरा** यास अहेर आणिला होता. त्यास **मीरा** ह्मणाला कीं, 'आह्मी **दीन** प्रसिद्ध करण्याकरितां जात आहों, तेथून विजयी होऊन आलों तर तुमचा हा पोशाख घेऊं. न आलों तर तुह्मीं पाठीमागून आमचे साह्यास यावें.' नंतर **मीरा** आपल्याबरोबर एक लक्ष ऐशीं हजार **पीर** घेऊन निघाला तो समुद्राचे कांठीं आला; व ती सर्व मंडळी नेण्याकरितां दर्यावर्दी लोक जहाजांची तयारी करूं लागले. परंतु **मीरा** यानें त्यांस, 'जहाजाची जरूर नाहीं,' ह्मणून सांगितलें; आणि आपल्या लोकांस ह्मणाला कीं, 'जे कोणी नमाज पढून दर्या उतरून जातील त्यांणीं मजबरोबर यावें; ज्यांच्यानें याप्रमाणें येववणार नाहीं त्यांणीं येऊं नये.' हें ऐकून सर्वजण नमाज पढावयास बसले. तों ईश्वरी कृपा होऊन ते सर्व अलगत आपल्या घोड्यांसह समुद्र ओलांडून **हिं**दुस्थानाचे किनाऱ्यावर उतरले ! नंतर तेथें त्यांणीं मुक्काम केला. त्या वेळीं **मीरा** ह्मणाला कीं, 'आपण आपल्या या फौजेसुद्धां गेलों तर हें वृत्त राजास कळून तो विशेष सावधगिरी ठेवील. याकरितां आपण सौदागराचे वेषानें घोडे विकण्याकरितां ह्मणून अजमीरास जाऊं.' त्याप्रमाणें **मीरा** हा सौदागर बनून घोडे घेऊन अजमीरास आला. हा नवीन सौदागर उत्तम उत्तम **आ**रबी घोडे घेऊन आल्याचें वर्तमान **पृ**थ्वीराजास कळल्यावर त्याणें आपला प्रधान **क**यमाष याला ते घोडे पाहण्यास व खरेदी करण्यास पाठविलें. **क**यमाष हा सौदागराचे मुक्कामावर येऊन पाहतो तों, उत्तम उत्तम घोडे रुप्याच्या सांखळ्यांनीं बांधलेले असून त्यांचे पुढें पाणी पिण्यास सोन्याचीं घंघाळें ठेविलीं आहेत व एकेक मनुष्य हातांत चंवरी घेऊन एकेका घोड्यावरच्या माशा वारीत आहे असें आढळलें. ते घोडे पाहून **क**यमाष फार खुष झाला व त्याला असें वाटलें कीं, असे पांच हजार घोडे जर आपल्या राजाजवळ असतील तर तो या सर्व **भ**रतखंडाचा चक्रवर्ती राजा होईल.' ह्मणून त्याणें किंमत विचारितां सौदागरानें एक एक लाख रुपये सांगितली. इतकी जबर किंमत ऐकून

त्यांची खरेदी करण्याची दिवाणास हिंमत होईना, परंतु तसाच ते घोडे पहात पहात तो पुढें चालला तों, एका वेगळ्याच तंबूंत **खिंग** नांवाचा एक अतिशय देखणा व उमदा घोडा सोन्याच्या सांखळीनें बांधलेला दिसला. त्याचे अंगावर भरजरी झुली असून पायांत रत्नजडित तोडे व पाणी पिण्यास वगैरे सोन्याचीं व चांदीचीं घंघाळें ठेविलेलीं होतीं. तसेंच, त्या घोड्याला जमिनीवर बसण्याकरितां त्याचे खालीं सर्वत्र मखमालीच्या गाद्या आणि रुजामे हंतरले होते. हा थाट बघून व अश्वपरीक्षाशास्त्राप्रमाणें त्याची परीक्षा करून हा फार उत्तम घोडा आहे असें त्यास समजलें. नंतर त्याची किंमत विचारतां छत्तीस कोट रुपये सौदागरानें सांगितली. हें वृत्त राजास कळविल्यावर त्याणें ती किंमत देऊन तो घोडा विकत घेण्याचा निश्चय केला. **मो**राचे मनांत या घोड्याचे किंमतींतच राजाचा खजिना संपून जाऊन त्यामुळें त्याला जिंकण्यास सोपें जाईल. शिवाय तो घोडा **पृ**थ्वीराजाचे नाशाकरितांच **खु**दानें **मी**रा यास दिला होता; यामुळें दोन्हीकडूनही सौदागराचें इष्ट साधत होतें. राजानें घोड्याचे किंमतीबद्दल खजिन्यांतील रोकड शिल्लक, सोनें, रुपें वगैरे सर्व भरतीस घालून सौदागराचा निकाल केला; आणि घोडा नेऊन हुजूर पागेंत बांधिला. तों तो काय विलक्षणच पायगुणी! अश्वशालेंत त्यास नेऊन बांधतात तों तो एकदां हिंसला व त्याणें जमिनीवर दुगाण्या झाडल्या. त्या हिंसण्याचा भयंकर आवाज ऐकिल्याबरोबर राजाच्या पागेंतील छत्तीस हजार घोडे मरण पावले, आणि दुगाण्यांच्या जोरानें **तारा**गड किल्ला जमिनींत पांच कोश खालीं उतरला! यामुळें जिकडे तिकडे सर्व लोकांत मोठा हाहाकार उसळला, व हा कांहीं तरी ईश्वरी क्षोभ आहे असें सर्व ह्मणूं लागले.

हा हलकल्लोळ व गलबला चालला असतां **रो**शन **अ**ली आपलें कापलेलें बोट दाखवीत पुढें आला आणि ह्मणाला कीं, 'माझें बोट कापलें त्याचें फळ कसें आहे तें दाखविण्यास आह्मी आलों आहों.' असें ह्मणून सर्व सौदागर लढाईस तयार झाले. तेव्हां त्यांजवर **पृ**थ्वीराजानें आपली फौज पाठविली. परंतु त्या **मु**सलमानांच्या तडाक्यांत

चतुर्थांश फौज खपली गेली व **पृ**थ्वीराजा मागें परतला. नंतर **मी**-रानें त्यास सांगून पाठविलें कीं, तुमचा एक वीर व आमचा एक वीर असे लढाईस नेमा; त्यांत जो हटेल तो पराभव पावला असें ठरवावें व त्याच्या पक्षाच्या लोकांनीं लढाई न करितां परत जावें.' राजानें हें ह्मणणें मान्य करून आपले सर्व सरदार व **सा**मंत एकत्र जमविले, आणि त्यांचे पुढें प्रतिज्ञेच्या विड्यांचें तबक ठेवून सांगितलें कीं, शत्रूकडील जो वीर लढाईला येईल त्याशीं एकट्यानें युद्ध करून जय मिळविण्याची ज्याची उमेद असेल त्यानें यांतील विडा उचलावा, परंतु तसें करण्यास कोणाचाच धीर होईना. प्रत्येकाला वाटे कीं, 'आपण धैर्यानें या वेळीं विडा उचलला, आणि पुढें यश आलें नाहीं तर सर्वांच्या अपयशाचें खापर आपले डोक्यावर फुटणार. तर येवढें कोणीं करावें ? त्या वेळीं जमलेली सभा उठून गेली.

तेव्हां **चा**मुंडराय **सा**मंतानें ही आणीबाणीची वेळ पाहून असा विचार केला कीं, कसेंही करून आपल्या राजाकडे अपकीर्ति येऊं द्यावयाची नाहीं. असा धीराचा निश्चय करून तो आपल्या पूज्य **दे**वीचे देवळांत गेला आणि त्याणें तिची अनन्यभावेंकरून बहुत स्तुति केली. **दे**वी त्यास प्रत्यक्ष दर्शन देत असे. परंतु त्या दिवशीं ती दर्शन देईना. तेव्हां त्यानें तिचे संतोषार्थ रेड्याचें बलिदान केलें; तरी ती प्रकट होईना. ह्मणून अनुक्रमें आणखी दोन रेडे बळी दिले तरी **दे**वी स्तब्धच राहून दर्शनलाभ होईना असें पाहून शेवटीं त्यानें आपलें मस्तक कापून प्रज्वलित केलेल्या अग्नींत टाकण्याचा निश्चय केला. तेव्हां **दे**वी सिंहारूढ होऊन त्या अग्निकुंडांतून आविर्भूत झाली, आणि **चा**मुंडरायाचा हात धरून ह्मणाली कीं, आतां यापुढें **भ**रतखंडांत **म्ले**च्छांचें राज्य होणार आहे व याजकरितां तुह्मांला यशप्राप्ति व्हावयाची नाहीं. ह्या गोष्टी व्हावयाच्या; त्यास इलाज नाहीं. परंतु तूं जर प्रतिज्ञेचा विडा उचलला तर युद्धांत तुझें रक्षण मी करीन.' असें अभिवचन देऊन **ज**गदंबा अंतर्धान पावली. त्यानंतर **चा**मुंडरायानें पुनः भरलेल्या सभेंत प्रतिज्ञेचा विडा उचलिला, व **मी**राकडील जो **म्ले**च्छ वीर युद्धास येईल त्याजबरोबर लढण्यास सिद्ध

झाला. मीरानें पृथ्वीराजाकडील ही तयारी पाहून आपल्याकडील उजबक फकीर नांवाच्या एका शूर वीराची पृथ्वीराजाकडील वीराबरोबर लढाई करण्यास योजना केली. या वीराचें वर्णन चंद भाटानें असें केलें आहेः—

"सुज शेख जात उजबक्क नाम, मीरा प्रधान पुनि जुद्ध धाम।
चालीस दून जिन पीठ ढाल, चालीस दून उर कंठमाल ॥
पच्चाश दून पेहेरे कवच्च, पच्चीश दून शिर टोप रच्च।
चकमार पंच मणको उदार, हजार तीर जिहि भाथ मार ॥
कब्बान पकर उजबक्क पीर, दोए कोशपें न चूकंत तीर।
दोए कोश पेंड पुनि तीर मार, सर लगत बान पाषान फार।
षट भोग जोग महिषा अहार, सुनि पराक्रम अरिगर्व गार ॥"

या वर्णनांतील भावार्थ केवळ पौराणिकी घाटाचा व अत्युक्तीचा आहेः—"त्याची ढाल ऐंशीं मण वजनाची होती. त्याच्या गळ्यांतली माळही तितकीच जड होती. त्याचें कवच शंभर मण जड होतें, व डोकीस घालण्याचा टोप पन्नास मण जड होता. त्याचा जंबिया पांच मणांचा असून त्याच्या भात्यांत हजार तीर (बाण) असत. त्याचें शरसंधान दोन दोन कोस लांबीवर सुद्धां न चुकतां काम करीत असे. त्याचा आहार सहा सहा टोणग्यांचा असून त्याचा पराक्रमही शत्रूंचा गर्व हरण करण्यासारखा असल्यामुळें त्याच्याशीं युद्ध करण्यास कोणी धजावण्याचा संभव नव्हता."

असें असूनही चामुंडरायानें त्याच्याशीं सामना करण्याची प्रतिज्ञा केली. यावरून तोही मोठा धीराचा व पराक्रमशाली होता असें सिद्ध होतें.

पुढें त्या दोघां वीरांचें युद्ध झालें, परंतु देवीच्या कृपेनें चामुंडरायासच यश मिळून त्याच्या हातानें उजबक फकीराचें शिर तुटलें. शिर तुटल्यावरही त्या फकीराचें धड कांहीं वेळ लढत होतें. परंतु शेवटीं तें पडलें. ह्या यशःप्राप्तीच्या आनंदानें पृथ्वीराजानें जयघोष करून शंखनाद केला. याप्रमाणें मुसलमान पराभूत झाले; तरी त्यांणीं आपला हेका न सोडितां अखेरीस ते मारामारीवर आले व करूं नयेत ते अनाचार करण्यास त्यांनीं प्रारंभ केला. अनहसागर तलावांत त्यांनीं एक

गाय मारून तिचें रक्त टाकिलें. त्यामुळें सर्व रजपुत लोकांस क्रोध येऊन त्यांनीं मीराचे लोकांवर हल्ला केला व सर्वांस ठार मारून टाकिलें. या रणकंदनांत रक्ताच्या नद्या वाहिल्या, व मांसभक्षक अशा खादाड गृध्रपक्ष्यांस मेजवानी झाली. सर्व मुसलमानांचीं डोकीं तुटलीं; तीं मक्केस गेलीं, तरी त्यांचीं कबंधेंच लढत होतीं. तेव्हां कोणीं असें सुचविलें कीं, 'त्या कबंधांस अग्निस्पर्श केला ह्मणजे तीं निर्जीव होतील.' त्याप्रमाणें ताबडतोब त्या सर्व धडांस गवत आणून त्याची आंच देतांच ते मुर्दे होऊन पडले. त्याप्रमाणें मीराची दुर्दशा होऊन, परत मक्केस जाऊन अशी अशी स्थिति व दशा झाली हें सांगण्यास देखील कोणी जीवंत राहिला नाहीं. हिंदुस्थानांत आला त्या वेळेचा त्याचा आवेश आणि फुशारी कशी होती, आणि आतां त्यास काय वाटूं लागलें असेल याची कल्पना कोणासही सहज होईल.

मीरासाहेब मक्केहून हिंदुस्थानांत यावयास निघाला त्या वेळीं त्याचें लग्न ठरलें असून त्याकरितां मक्केस वऱ्हाड जमलें होतें व ठिकठिकाणचे अहेर आले होते. त्यांतच मीराचा मामा ख्वाजा पीर हाही अहेर घेऊन आला होता. इतक्यांत इकडील युद्धाची तयारी झाली व मीरानें मामास सांगितलें कीं, 'यश मिळालें तर परत येऊन सर्व समारंभ यथास्थित होईल; नाहीं तर तुह्मीच आमचे साह्यास यावें,' वगैरे हकीगत पूर्वी आली आहेच. त्याप्रमाणें मीराच्या सैनिकांचीं मस्तकें जेव्हां धडाधड मक्केस जाऊन आदळूं लागलीं तेव्हां ख्वाजा पीरानें मीरास साह्य करण्याकरितां येण्याची तयारी केली, व तो जो मक्केहून [1]उडाला तो अजमीरास येऊन दाखल झाला. तेथें आल्यावर त्यानें फकीराचा वेष धारण केला व अनहसागर त-

---

१ आमच्या पुराणांत ज्याप्रमाणें हनुमंताच्या उड्डाणाची वगैरे ठिकठिकाणीं रेलचेल आढळते त्याप्रमाणें चंद भाटाच्या ऐतिहासिक काव्यांत या असंभाव्य कल्पनेचा ठिकठिकाणीं उल्लेख आढळतो. तथापि यावरून इतका तर्क बांधितां येतो कीं, हे लोक जहाजांतून हिंदुस्थानाच्या कांठीं उतरले. खुषकीच्या मार्गानें काबुलांतून आले अशी जी कोणाची समजूत असेल ती खरी नव्हे.

त्यावर आपलें आसन घातलें. मुसलमान फकीरांस त्रास दिला असतां काय अनर्थ व संकटें उद्भवतात याविषयीं, रोशन अलीला त्रास दिल्यामुळें जो अनर्थ आणि रणकंदन माजलें त्यावरून राजाचें अंतःकरण पोळलें होतें; व ह्मणून, त्यानें या नवीन ढोंगी फकीराचे वाटेस कोणीं जाऊं नये असा निश्चय केला. तथापि हें भावी दुश्चिन्ह असून या फकीराकडून कांहीं तरी उत्पात होईल अशी राजास धास्ती होती. ह्मणून त्याणें क्षेत्रपालांची प्रार्थना केली, तेव्हां ते प्रत्यक्ष आविर्भूत झाले. त्या वेळीं राजानें त्यांची विनंति केली कीं, 'तुह्मी ख्वाजा पीराकडे जाऊन त्याचा बंदोबस्त करून यावें.' राजाच्या विनंतीप्रमाणें ते त्या फकीराकडे गेले. तों असा चमत्कार झाला कीं, ते त्या फकीराचे करामतीस आणि ढोंगास भुलून त्याचेच शिष्य झाले आणि राजाची काळजी असावयाची तशीच राहिली. पुढें राजाचे मंत्रिमंडळामध्यें जेव्हां हें वृत्त कळलें तेव्हां मुख्य प्रधान कयमाष यानें अशी युक्ति सुचविली कीं, 'त्या फकीराकडे कोणी तरी सुंदर व चतुर स्त्री पाठवून त्याला लुब्ध करावें; कीं तेणेंकरून त्याच्या योगसाधनांत व तपश्चर्येंत व्यत्यय येऊन त्याची अद्भुत शक्ति मंद व्हावी आणि आपला हेतु साधावा.' तेव्हां रामगुरु नांवाचा पुरोहित आणि चंद भाट वगैरे मंडळींनीं असें सुचविलें कीं, 'राजेसाहेबांच्या दाईची मुलगी सुंदर व चतुर आहे. तिची या कार्याकडे योजना केली तर काम फत्ते होईल. असें करण्यांत राजेसाहेबांनीं आपला कांहीं कमीपणा समजूं नये. कारण, राज्यसंरक्षणाकरितां राजानें कांहींही केलें तरी चिंता नाहीं.' मंत्रिमंडळाच्या या सूचनेप्रमाणें राजानें आपल्या दाईचे चतुर मुलीस त्या फकीराकडे पाठविलें. परंतु याही वेळेस पूर्वीसारखाच चमत्कार झाला; कीं, ही तरुणी त्यास मोह घालण्याकरितां ह्मणून गेली तों फकीरानें तिला आपली कन्या ह्मणून, तिलाच आपले जवळ ठेवून घेतलें, व तीही ख्वाजा पीरास आपला गुरु ह्मणून त्याची सेवा करण्यास त्याचेजवळ राहिली!

हाही प्रयत्न निष्फळ झाल्यावर सर्वांचे विचारें राजानें चंद भाट यासच त्या फकीराकडे पाठवून त्याचा काय विचार आहे वगैरे सर्व

हकीकत समजून घेण्याचें ठरविलें. आणि 'दोन वेळां जशी फसगत झाली तशी या वेळेस न होवो' असें राजानें चंदास ह्मटलें. तेव्हां चंदानें आपला निश्चय राजास कळवून, 'त्याविषयीं कांहीं काळजी करूं नका' असें सांगितलें. नंतर तो राजाज्ञा घेऊन त्या फकीराकडे गेला व त्यानें त्या फकीराची स्तुति वगैरे करून 'आपण येथें किंनिमित्त आलांत?' वगैरे प्रश्नांनीं खुलासा काढण्यास सुरवात केली. तेव्हा ख्वाजा पीरानें सांगितलें कीं, 'ज्या अर्थीं या जमिनीवर पीराचें रक्त पडलें आहे त्या अर्थीं, या भूमीवर राजा पृथ्वीराज याणें न राहतां येथून आपली चीजवस्त सर्व उचलून दुसरीकडे कोठें राजधानी करावी; अथवा त्याला आपल्या आजाचा वारसा मिळाला आहे तिकडे दिल्लीस जाऊन रहावें.' याप्रमाणें चंदाजवळ त्याणें सांगून, हें सांगणें ह्मणजे साधारण नसून ईश्वरोक्त आहे असें भासविण्याकरितां, त्याणें आणखी असें सांगितलें कीं, 'मी जें, राजानें अजमीर सोडून जावें ह्मणून सांगतों, याजबद्दल चार दिवसांतच राजास दृष्टांत होईल. त्याचप्रमाणें येथून चार कोशांवर चार कोट रुपयांचा खजिना जमिनींत आहे तो राजास सांपडेल.' ख्वाजा पीराचें हें मिष्ट व दैविक भाषण ऐकून चंद राजाकडे आला व त्याणें त्या फकीराची तारीफ करून राजास सांगितलें कीं व्यर्थ त्याला त्रास देण्यांत फायदा नाहीं. त्याजमध्यें कांहीं दैविक शक्ति असल्यामुळें आपण त्यास शरण जावें हें बरें.'

चंदाचा हा अभिप्राय ऐकून राजा पृथ्वीराज याणें आपल्या इतर मंत्रिमंडळीचा विचार घेतला; आणि सर्वांचा विचार मिळाल्यावर तो ख्वाजा पीराचे भेटीस गेला. तेथें गेल्यावर त्याणें ख्वाजास नमन केलें व मोठ्या अदबीनें त्याचेजवळ बसला. ख्वाजानेंही राजा पृथ्वीराज याचा विनय पाहून त्यास यावें दिल्लीपति!' असें ह्मणून त्याचें योग्य रीतीनें आगतस्वागत केलें. नंतर पृथ्वीराजानें, ख्वाजाचे ह्मणण्याप्रमाणें अजमीर मुसलमानांचे स्वाधीन करून आपला सर्व सरंजाम व फौजफांटा घेऊन, दिल्लीचा मार्ग धरिला. जातां जातां वाटेंत त्याणें, नुकत्याच संपलेल्या रणकंदनांत बळी पडलेल्या आपल्या सैनि-

कांचे मुक्त्यर्थ गयातीर्थावर श्राद्धें वगैरे केलीं, आणि दिल्लीस दाखल झाला. अजमीर सोडून निघाल्यावर पीरानें सांगितल्याप्रमाणें थोड्याच अंतरावर त्याला चार कोटींचा ठेवा सांपडला व त्यामुळें पीराचे दैविकपणाविषयीं त्याची विशेष खात्री होऊन त्याजबद्दल त्याला विशेष पूज्यबुद्धि उत्पन्न झाली. ह्याप्रमाणें मुसलमानांचे हातांत क्षत्रियवंशाकडून अजमीरचा प्रांत गेला व पृथ्वीराज चव्हाण हा दिल्लीचा अधिपति झाला.

## प्रकरण तिसरें.

---

पट्टणचा राजा भोळा भीमदेव.—भीमदेवाशीं प्रमारराजाची लढाईची तयारी.—प्रमारास पृथ्वीराजाचें साह्य.—पृथ्वीराजाचे सैन्याची व्यवस्था.—पृथ्वीराजाचा भीमदेवावर विजय.—प्रमारकन्या इच्छनी कुमारी इजसी पृथ्वीराजाचा विवाह.

या वेळीं गुजराथेंतील अन्हिलपूर, ज्यास हल्लीं 'पट्टण' ह्मणतात, तेथें चालुक्यवंशीय (सोळंखी) भोळा भीमदेव नांवाचा राजा राज्य करीत होता. हा मोठा पराक्रमी असून त्याचें सैन्य नेहमीं सज्ज असे व त्यामुळें तो यशस्वी ह्मणून प्रसिद्ध होता. हा मोठा विलासी व शृंगारप्रिय होता. याचे हाताखालीं पुष्कळ किल्ले व दुर्ग असून कित्येक मांडलिक यास करभार देत असत. त्याजवळ विद्वान् व मसलती लोकांचा समाज चांगला असे. प्रसिद्ध 'अमरकोशा'चा कर्ता जो अमरसिंह नामक जैन पंडित तो याचाच आश्रित असे. या अमरसिंहास देवता प्रसन्न असून मंत्रसिद्धिही होती अशी प्रसिद्धि आहे. त्याणें एके अमावास्येचे दिवशीं आपल्या तपःसामर्थ्यानें राजा भीमदेव यास चंद्रदर्शन करविलें होतें असें ह्मणतात. अस्तु, ह्याप्रमाणें भोळा भीमदेव राज्य करीत असतां त्याला समकालीन असा अबूवर जैत प्रमार नांवाचा राजा राज्य करीत होता. या राजास सलख नांवाचा एक पुत्र व इच्छनी कुमारी नांवाची एक कन्या अशीं दोन अपत्यें होतीं. त्यांत इच्छनी कुमारी ही अतिलावण्यवती असल्यामुळें ती आपली राणी असावी अशी वरील अन्हिलपुराधीश भीमदेव यास

इच्छा होऊन, त्याणें तिची मागणी करण्यास वर लिहिलेला प्रसिद्ध पंडित **अमरसिंह** यास मध्यस्थ करून **प्रमार** राजाकडे पाठविलें. या मागणींत **भीमदेवानें अमरसिंहाबरोबर प्रमार** राजास असेंही निदानींचें सांगणें सांगून पाठविलें होतें कीं, 'जर तूं आपली कन्या मला देणार नाहींस तर **अबूचें** राज्य तुला सोडून जावें लागेलं.'[१] अमरसिंहानें आपल्या राजाज्ञेप्रमाणें **प्रमार** राजाकडे जाऊन त्याची भेट घेतली व राजाची मागणी त्यास कळविली. परंतु **प्रमार** राजानें **भीमदेव** राजाची ही मागणी मुळींच कबूल न करितां, बोलणें लावण्यास आलेल्या **अमरसिंह** पंडितास साफ 'नाहीं' ह्मणून सांगितलें. आणि या नकारावरून **भीमदेव** आपल्याशीं युद्ध करण्यास तयार होणार, येवढ्याकरितां आपण अगोदरपासूनच त्याच्याशीं सामना करण्याची

---

१. याजवरून कन्याहरणाची चाल इ० स० १२०० मध्येंही होती, व या चालीचे अनर्थ शेवटीं जयपूरच्या राजाची कन्या कृष्णाकुमारी इच्या वेळेपर्यंत चालत आले होते. ही दुष्ट चाल, ज्या काळीं क्षत्रिय मदोन्मत्त होऊन स्त्रिया ह्मणजे जंगम मिळकत किंवा चालता बोलता माल असें समजूं लागले तेव्हांपासून सुरू झाली असावी असा अजमास आहे. तथापि, त्रेतायुगापासून स्त्रियांच्या हरणाचे दाखले सांपडतात. रामचंद्राची स्त्री सीता इचें रावणानें हरण केलें. बलरामाची भगिनी सुभद्रा व कन्या वत्सला यांचें अनुक्रमें अर्जुन व अभिमन्यु यांनीं हरण केलें होतें. ग्रीस देशाच्या इतिहासांतील ट्रॉय्‌ची लढाई ही हेलन नांवाच्या स्त्रियेस हरण केलें त्यावरून उद्भवल्याचें 'ईलियड्'काव्यांत लिहिलें आहे. याशिवाय आपल्या हिंदुस्थानांतील अर्वाचीन इतिहासांत नूरजहान नांवाच्या रूपवती स्त्रियेस तिच्या नवऱ्यापासून सेलीम बादशाहानें हरण केलें, वगैरे अनेक दाखले आढळतात. राज्याधिकाऱ्यांकडून स्त्री किंवा कन्या यांचें हरण झालें ह्मणजे ते इतिहासांत दाखले राहतात. बाकी पृथ्वीवर सर्वत्र स्त्रियांस फितवाफितवीचे निंद्य प्रकार सर्व वर्गाच्या लोकांमध्यें दृष्टीस पडतात; त्यांत मोठेंसें आश्चर्य नाहीं. चांगल्या वस्तूवर राजे, अधिकारी, बलिष्ठ आणि वरिष्ठ यांची दृष्टि राहून ते आपला हेतु अनेक निंद्याचरणांनीं शेवटास नेण्यास पहात असतात. परंतु अशा समयीं त्यांचे दांत त्यांच्या घशांत गेले ह्मणजे बरें होतें.

सिद्धता करून ठेवावी; असा विचार करून, प्रमार राजानें दिल्लीस पृथ्वीराजाकडे मदत मागितली. त्यावरून त्याचे साह्यार्थ पृथ्वीराज निघून गुजराथेंत आला. त्या वेळेस त्याचेबरोबर त्याचा प्रधान कयमाष, चंद, चंद पुंडीर, चामुंडराय, नीरधरराय राठोड, कुरंभदेव, जाम यादव, बळिभद्र, आजानुबाहु लंगडिराय, गोविंदराय, सारंग, हाहुलीराय हमीर, अबूचा राजा जैत व त्याचा युवराज सलख, आणि पृथ्वीराजाचा चुलता कन्ह चव्हाण असे मोठमोठे पराक्रमी सरदार व त्यांचीं सैन्यें होतीं. अबूच्या राजाकडून या प्रकारची सामन्याची तयारी झालेली पाहून भीमदेवानेंही युद्धाची तयारी चालविली. त्याणेंही आपल्याकडे बहुत सैन्य जमवून अनेक सरदार गोळा केले. त्याच्या मदतीस कच्छ येथून तीन हजार स्वार आले, सोरठचे राजाकडून पंधराशें आले, कधीं नेम अथवा निशाण न चुकणारे [१]काकारेज येथील तिरंदाज कोळी, शत्रूला कधीं पाठ न दाखवणारे असे झालावाड येथील लढवय्ये झालालोक, कावाचे नायक मुचकुंद, काठेवाडचा काठीराजा, आणि याचप्रमाणें परगण्यापरगण्यांतून लहान मोठी सेना, असें मोठेंच सैन्य जमा झालें.

अबूच्या जैत प्रमार राजास, भीमदेवानें, 'तुझी कन्या दे, नाहीं तर राज्य खाली करून दे' अशी भीति घातली हा मोठाच अन्याय केला व या अन्यायाचे पारिपत्यार्थ प्रमार याणें आपला मित्र पृथ्वी-

---

१. गुजराथेंत प्रांताप्रांतास निरनिराळीं जुनीं नांवें आहेत. तीं हल्लीं बदलून त्यांचे जागीं दुसरीं झाल्यामुळें त्या जुन्या नांवांवरून ते ते प्रांत ओळखण्याची पंचाईत पडते. बडोद्याचे वरच्या प्रदेशास (उत्तरेकडे) 'चरोत्तर' ह्मणतात. खालच्या (दक्षिणच्या) प्रदेशास 'कानम' ह्मणतात. पूर्वेकडील प्रांतास 'चुवाल' ह्मणतात. पालनपूरचे पलीकडे डिसाप्रांत आहे. त्यास 'काकारेज' ह्मणतात. डिसाचे बाजूस 'ढेंढार' ह्मणतात. याशिवाय गुजराथेंत कित्येक प्रांत क्षत्रियांनीं वसविले आहेत त्यांचे नांवांवर ते ते प्रांत मोडतात. ह्मणजे—गोहिलवाड (भावनगर), झालावाड (मोर्सीप्रांत), उखामंडल (द्वारकाप्रांत) इ०

राज यास साह्य करण्याकरितां बोलावणें केलें, ह्या गोष्टी सर्व बरोबरच झाल्या. परंतु यामध्यें दुसरी एक ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट ही होती कीं, अबूच्या राजाचे मदतीस ह्मणून येण्यांत पृथ्वीराजाचा दुसरा एक हेतु सिद्ध झाला. तो हेतु हा होता; पृथ्वीराजाचा बाप सोमेश्वर याची आणि भीमदेवाची लढाई होऊन तींत भ.मदेवाचे हातानें सोमेश्वर राजाचा मृत्यु झाला होता व त्यामुळें त्याजमध्यें आणि पृथ्वीराजामध्यें फारां दिवसांचें वैर होतें. तें वैर उगविण्याचा हा अनायासेंच संधि आलेला पाहून पृथ्वीराज एकदम अबूच्या राजास साह्य करण्याकरितां ह्मणून निघून आला. वस्तुतः पृथ्वीराजास इतका क्रोध येण्यासारखें प्रत्यक्ष कारण दुसरें कांहीं नव्हतें.

पृथ्वीराजानें प्रथम भीमदेवाकडे आपला प्रिय मित्र चंद भाट यास, युद्धप्रसंग न आणण्याविषयीं सामदामाचें बोलणें करण्याकरितां, शिष्टाचाराप्रमाणें पाठविलें. त्या वेळीं चंदानें आपल्याबरोबर जाळें, शिडी, समई, कुदळी, अंकुश आणि त्रिशूळ असे जिन्नस नेले होते. भीमदेवाची व चंदाची भेट झाल्यावर भीमदेवानें चंदास विचारिलें कीं, ह्या जिनसा तुह्मीं आपल्याबरोबर कशाकरितां आणिल्या आहेत?' चंदानें सांगितलें कीं, 'तुह्मीं लढाईचा प्रसंगच आणिला, आणि त्यांत पराभव पावून लपत फिरलां, तर तेथून हुडकून काढण्याकरितां व तुमचा नाश करण्याकरितां ह्या जिनसा आह्मीं आपल्याजवळ बाळगिल्या आहेत. पृथ्वीराजाचें सैन्य संनिध येऊन ठेपलें आहे व तें एकदां सामन्याला उभें राहिलें ह्मणजे मग तुह्मी पाण्यांत जाऊन बुडून राहिलां तर हें जाळें टाकून तुह्मांस बाहेर काढूं; स्वर्गावर कोठें दडून बसलांत, तर ही शिडी लावून तेथून हुडकून काढूं; अंधारांत लपून बसलां तर हा दिवा लावून शोधून काढूं; पृथ्वीचे पोटांत भुयार करून तेथें राहिलांत, तर या कुदळीनें तें गुप्त स्थळ खणून काढूं; आणि ह्याप्रमाणें सांपडल्यावर ह्या त्रिशूलानें व अंकुशानें तुमचा नाश करूं; अशी पृथ्वीराजाची प्रतिज्ञा आहे.' हें ऐकून भीमदेवानेंही धिटाईनें चंदास उत्तर दिलें कीं, 'अशा गोष्टींनीं आह्मी भीत नाहीं. लढाईअंतीं जें घडायाचें असेल तें घडेल.' यावर चंद बोलला, 'याचा तूं

दूरवर विचार केला नाहींस. उंदरानें मांजरावर कधीं जय मिळविला आहे काय? गृध्रपक्ष्यानें पवित्र हंसांचे समोर सुंदर चालीची शेखी मिरविली आहे काय? सामन्याला उभें राहून हरणानें कधीं सिंहाशीं बरोबरी केली आहे काय? सापाबरोबर बेडूक कधीं झुंजला आहे काय? या गोष्टी क्वचित् दैववशात् कोठें घडल्या तर अपवादांत येतील; परंतु साधारणतः तशा गोष्टी घडणें अशक्य आहेत. आणि ह्या सर्व गोष्टी एकीकडे ठेविल्या, तरी मोठमोठीं अरण्यें आणि पर्वत जाळून भस्म करणाऱ्या अग्नीपुढें यःकश्चित् दिव्यानें बरोबरी करण्याची बढाई मारावी काय?' यावर भीमदेवानें उत्तर दिलें कीं, 'भाटाचे छोकरे अशी बडबड करून दुसऱ्यास निरुत्तर करितात, मूर्ख लोक शिव्या देऊन दुसऱ्याचें तोंड बंद करितात; आणि जिंदगींतले वांटेकरी भाऊबंद आपला वांटा मागून दुसऱ्यास कुंठित करितात. परंतु आमच्यासारखे शूर हे मृत्यूशीं झुंजणारे असून ते अशा बडबडीस भीक घालीत नाहींत. असें पृथ्वीराजास सांग.' याप्रमाणें उभयतांचीं बोलणीं झाल्यावर चंद परत आपल्या गोटांत आला, आणि दोघांकडील सैन्यें साभ्रमती ( साबरमती ) नदीचे कांठीं युद्धास सज्ज झालीं.

पृथ्वीराजाकडील सैन्याची व्यवस्था त्याचा चुलता कन्ह चव्हाण याजकडे सोंपविली असून कन्ह याणें आपल्या सैन्याचे व्यूह[१] रचिले होते. सर्व सेनेचें आधिपत्य पृथ्वीराजानें नीरधरराय राठोड याजकडे दिलें असून युद्धाचे पूर्वी राजानें सेनापतीचे हातांत हात घालून मोठ्या प्रेमानें सांगितलें कीं, 'पहा, या सर्व युद्धाचें स्वामित्व व यश तुजकडे आहे. तुझें जें काय बळ आणि कौशल्य आहे तें आतां या वेळीं दाखविलें पाहिजे. तूं या जगतीय सुखाकडे लक्ष्य देण्यापेक्षां

---

१. क्षत्रियांस सैन्याची रचना कशी करावी वगैरे ठाऊक होतें. परंतु त्यांचें युद्ध तीरतरवारींनींच चालत असे. कारण, त्या वेळीं त्यांस दारूगोळा ठाऊक नव्हता. याचप्रमाणें हल्लींच्या प्रकारचीं रणवाद्यें पूर्वी नसून युद्धांमध्यें वीरांनीं जयप्राप्तिसूचक व आपल्या सैनिकांस उत्साहप्रद असा शंखनाद करण्याची वहिवाट होती.

धारातीर्थी पडून स्वर्गसुखाची अपेक्षा करावी व स्वामिकार्यार्थ झटून आपल्या सदुदाहरणांनीं आपल्या बरोबरीच्या सरदारांस प्रोत्साहन द्यावें हें तुझें कर्तव्य आहे.' यावर नीरधररायानेंही मोठ्या नम्रपणें उत्तर दिलें, 'महाराज, आपण त्याविषयीं बेफिकीर असावें. आपले मित्र सामंत हे शत्रूचा पिच्छा पुरवतील असे आहेत. तशीच सैन्याची व्यवस्था करण्यास कन्ह काका हे मला साह्यकारी आहेत; व त्यांना लहानपण, तरुणपण आणि हल्लींची वृद्धावस्था या तिन्ही अवस्थांत महावीर व योद्धे भीष्माचार्य यांच्याप्रमाणें युद्धाविषयीं एकसारखा आनंद असल्यामुळें, त्यांच्या पाठबळानें शत्रूची दाणादाण करून देऊं; आपण चिंता करूं नये.' नीरधररायाचें हें शौर्यवीर्योत्पादक सविनय उत्तर ऐकून पृथ्वीराज सानंद झाला व त्याणें नीरधररायास एक मुक्तामाला बक्षीस दिली. याप्रमाणें एकमेकांस उत्तेजन देऊन लढाईची तयारी झाली. पृथ्वीराज, कन्ह काका, आणि सेनापति नीरधरराय असे घोड्यांवर बसून सेनाभाराच्या पाठीवर रक्षणार्थ सभोंवार फिरत होते त्या वेळीं कन्ह काकांनीं पृथ्वीराजास आवेशपूर्वक सांगितलें कीं, 'राजा, तूं काळजी करूं नकोस; आह्मी तुझे रक्षणकर्ते आहों. आह्मांकडून जर तुला यशःप्राप्ति न झाली तर आह्मांला धिक्कार असो.' यावर राजानेंही फार विचाराचें आणि चतुराईनें उत्तर दिलें. तो ह्मणाला, 'काका, त्या सर्व गोष्टी खऱ्या. पण प्रसंग कसा येईल हें कोणीं सांगावें? सुग्रीव येवढा बलिष्ठ, पण असा एक प्रसंग आला कीं, त्याच्यानें त्याच्या स्वतःच्या बायकोचें देखील रक्षण करवलें नाहीं! महायोद्धा कर्ण व त्याचे दुर्योधनादि महावीर मित्र, पण त्यांच्यांनीं त्याचें रक्षण झालें नाहीं! रामचंद्रासारख्याकडून वनामध्यें सीतेचा सांभाळ झाला नाहीं! पांडवांसारखे महापराक्रमी पंचभर्ते असून द्रौपदीची लज्जा रक्षण झाली नाहीं! तेव्हां तुह्मांकडून यशःप्राप्ति होऊन माझें रक्षण न झालें तरी त्यांत मोठेंसें दुःख मानण्याचें कारण नाहीं. तुह्मी सर्व माझे अभीष्टचिंतक आहांत. तेव्हां त्याला अनुसरून जें करणें उचित दिसेल तें तुह्मी कराल अशी माझी खात्री आहे. यावर कसा वखत येईल तो कोणीं सांगावा?'

भीमदेवाचीही तयारी होतीच. लढाईला प्रारंभ होऊन उभयतांकडील बरेच लोक घायाळ होऊन पडले. या समयीं रणभूमींत मरून पडणारांस नेण्याकरितां स्वर्गाहून विमानें उतरत होतीं; व देव, गंधर्व, आकाशांतून पुष्पवृष्टि करीत होते असें चंदकवीनें वर्णन केलें आहे. अर्धा प्रहरपर्यंत तुंबळ युद्ध झालें. यांत चव्हाणां(पृथ्वीराजा)कडील बहुत योद्धे पडले. परंतु पुढें चालुक्यांचा (भीमदेवाचा) मोड होऊन चव्हाणांची सरशी झाली आणि भीमदेव समरभूमींतच मरून पडला[१].

येणेंप्रमाणें गुर्जराधिपतीचा पाडाव केला व अबूच्या राजाची काळजी दूर करून त्याच्याच इच्छेवरून इच्छनी कुमारीचें पृथ्वीराजानें पाणिग्रहण केलें; व मोठ्या विजयश्रीनें पृथ्वीराज दिल्लीस परत गेला.

---

## प्रकरण चौथें.

पृथ्वीराजाकडून पद्मावतीचें पाणिग्रहण.—शहाबुद्दीनाशीं युद्धप्रसंग व त्याचा पराजय.—महोबाचा राजा परमाल याजबरोबर कलह.—परमालाचे सरदार उदल व अल्ह यांस परमालाकडून हद्दपारीची शिक्षा.—पृथ्वीराजाची चंदेला(बुंदेलखंडा)वर स्वारी.—लढाईविषयीं परमाल राजाचा विचार—त्याची तयारी व लढाईत पराजय.—अल्ह व उदल यांस परत बोलावण्याचा विचार.—त्यांस आणण्याकरितां परमालाकडून जगनक भाटाची रवानगी.—त्यांचें महोबास पुनरागमन.—युद्धाची सज्जता व तिचें वर्णन.—अल्ह व उदल लढाईला निघतात.—परमाल राजा भिऊन पळून जातो.—याचा पुत्र ब्रह्मजित् याचें धैर्य.—महोबा येथील लढाईची सुरुवात.—उ-

---

१. वर जो भीमदेवाचा रणांगणांत अंत झाला ह्मणून लिहिले आहे, हें चंद भाटाच्या ग्रंथाधारें लिहिलें आहे. व यावर फॉर्बस् साहेब—गुजराथचा इतिहास लिहिणारे—यांचाही भरंवसा आहे. परंतु, याविषयींची मुसलमानी ग्रंथकारांनीं जी हकीगत लिहिली आहे तींत, वरील लढाई झाल्यावर व भीमदेवाचा पराजय झाल्यावर मागाहून भीमदेव जीवंत होता; तो या लढाईत मारला गेला ही गोष्ट खोटी आहे असें लिहिलें आहे. कांहींही असो. या वेळीं भीमदेवावर पृथ्वीराज विजयी झाला ही गोष्ट खरी आहे.

दल याचें शौर्य आणि त्याचा मृत्यु.—उदल याचें वर्णन.—अल्ह याचा पराक्रम.—ब्रह्मजिताचा पृथ्वीराजाकडून अंत.—अल्ह शस्त्रत्याग करून वैराग्य धारण करितो व रणांतून चालता होतो.—महोबाचे लढाईचा शेवट व पुढील व्यवस्था.—पृथ्वीराज दिल्लीस परत जातो.

पूर्वदिशेस **समुद्रशिखर** ह्मणून राजधानी होती. तेथें **यादवकुळां**-तला **विजयसुर** नामक राजा होता. त्याला **पद्मावती** नांवाची एक रूपवती व चतुर कन्या होती. तिणें **पृथ्वीराजाचे** गुण व कीर्ति ऐकून त्याला असें पत्र लिहिलें कीं; 'ज्याप्रमाणें श्रीकृष्णानें रुक्मिणीचें पाणिग्रहण करून तिला नेलें, त्याप्रमाणें आपण येऊन मला घेऊन जाऊन माझें पाणिग्रहण करावें. आपल्यावांचून इतर पुरुष मला बापाभावाप्रमाणें आहेत.' हें पत्र लिहून तिणें पोपटाचे चोचींत दिलें व तो पोपट **पृथ्वीराजाकडे** पाठविला. **पृथ्वीराजानें** तें पत्र पाहून **पद्मावतीस** वरण्याकरितां निघण्याची तयारी केली. तो आठ हजार सैन्य घेऊन **समुद्रशिखर** राजधानीस गेला व **पद्मावतीचें** पाणिग्रहण करून परत **दिल्लीस** येण्याकरिता निघाला. तों रस्त्यांत **शहाबुद्दीन गोरी** नांवाचा तत्कालीन एक **मोगल** सरदार होता तो **पृथ्वीराजास** आडवा आला. या **मोगल** लोकांविषयीं **चंद भाट** आपल्या '**रास्यां**'त असें वर्णन करितोः—

> **"मुगल भले खुरासानके, भूरे भारे गात ।**
> **जिन देखी नर थरहरे, दो दो दुंभी खात ॥"**

ह्मणजेः—"**खुरासानचे** भले उंच धिप्पाड **मोगल** लोकांस पाहून इतर माणसें थरथर कांपतात."



---

१. पूर्वीं प्रेमाचीं पत्रें नेण्याचे कामीं शुक (पोपट) सारिका (साळुंख्या), हंस वगैरे पाळींव पक्ष्यांची योजना करीत असल्याचे ठिकठिकाणीं दाखले सांपडतात. निषधदेशाधिपति नलराजा याचा प्रीतिसंदेश घेऊन जाणारा हंस होता असें 'महाभारतां'त वर्णन आहे. पक्ष्यांच्या मार्फत पत्रव्यवहार ठेवण्याची रीति हल्लीं कोणासही फारसी आश्चर्याची वाटणार नाहीं. मोठमोठ्या युद्धांमध्यें कबूतरांच्या मार्फत पत्रें पाठविण्याची वहिवाट आपल्या **१८७२ सालच्या फ्र्यांको-जर्मन लढाईपासून माहीत झाली आहेच.**

यावरून **खो**रासानच्या **मु**सलमानांपेक्षां **हिं**दुस्थानांतले **क्ष**त्रिय शरीररचनेनें ठेंगू किंवा कमी भयंकर होते असें दिसतें. अस्तु. **श**हाबुद्दीन आडवा आला तसा **पृ**थ्वीराजाचे सैन्याचा त्याचा सामना होऊन त्यांत पांच हजार **मु**सलमान लोक पडले व **श**हाबुद्दीन **गो**री हा कैद झाला. परंतु शेवटीं त्याजपासून आठ हजार घोडे खंडणी घेऊन त्याला सोडून दिलें. नंतर **पृ**थ्वीराज सैन्यासह **दि**ल्लीस परत जात असतां त्याचे कित्येक घायाळ झालेले लोक रस्ता चुकून **चं**देल प्रांताची (**बुं**देलखंडाची राजधानी जें **म**होबा शहर तेथें गेले, आणि तेथील राजाचे बागेंत विश्रांतीकरितां शिरले. त्या वेळीं त्या बागेंतल्या माळ्याचा व या चुकारू लोकांचा तंटा होऊन त्याणें यांस शिव्या देऊन त्यांना बागेंत जाण्यास प्रतिबंध केला. तेव्हां त्यांनीं त्याला न जुमानतां त्या आवेशांत त्याचा शिरच्छेद करून ते तसेच त्या बाह्योपवनांत जाऊन उतरले.

माळ्याचा नाश झालेला पाहून त्याची बायको विपळाप करीत **म**होबाचा राजा **प**रमाल याचे राणीकडे जाऊन तिणें तिला त्या दांडग्या लोकांचा सर्व वृत्तांत कळविला. तेव्हां राणीनें आपल्या भर्त्यास तो मजकूर सांगितल्यावरून **प**रमाल राजानें, या परकीय लोकांवर आपला **उ**दल नामक एक सरदार त्याच्या हाताखालच्या सर्व सैन्यासहवर्तमान पाठवून त्याणें त्याचें पारिपत्य करण्याविषयीं हुकूम दिला. त्यावरून **उ**दल याणें जाऊन त्यांस घेरिलें, व त्यांचा मुख्य **क**नक **च**व्हाण ह्मणून होता त्याचा शिरच्छेद करून आलेल्या लोकांसही त्या युद्धांत बळी पाडिलें. येणेंकरून **प**रमाल राजास संतोष व्हावयाचा; परंतु **उ**दल याचेविषयीं, **मे**हेला आणि **भू**पति असे दोघे **प**रमाल राजाचे दरबारांत होते त्यांणीं, नानाप्रकारच्या चुगल्या राजाला सांगून त्याचे कान भरवून ठेविले होते. **प**रमाल राजा तरी विचारी व दूरदर्शी नसून हलक्या कानाचा व बुधप्रकृतीचा होता. त्याला मनुष्याची तादृश पारख नसून जो जसें सांगेल तसें त्याचें मन वळत असे. त्याला स्वतःचें मत ह्मणून कांहीं नसे, व यामुळें राज्यकारभाराला जसा मनुष्य असावा तसा तो नव्हता. **उ**दल याणें आगंतुक लोकांचें पारि-

पत्य केलें त्याविषयीं त्यास राजाकडून मिळावयाचा तो मान तर मिळाला नाहींच. परंतु वरील दरबारच्या हलकट लोकांनीं राजाला भर दिल्यामुळें राजाचा व उदल याचा बेबनाव होऊन उदल याणें देशत्याग केला व तो कनौजच्या राजाजवळ येऊन राहिला. परमाल राजा व उदल सरदार यांजमध्यें बेबनाव होण्याचें कारण असें झालें कीं, उदल यास अल्ह ह्मणून एक भाऊ होता, व तोही राजाच्या सरदारांपैकींच एक होता. त्याजवळ कित्येक उत्कृष्ट घोडे होते. ते घोडे, उदल याचा हेवा करणाऱ्या राजदरबारांतल्या वर सांगितलेल्या लोकांचे सांगीवरून, राजानें त्या दोघां भावांजवळ मागितले. परंतु आपले घोडे राजाकडे देण्याचें त्या दोघांनीं नाकारून याविषयीं त्यांची आई देवल देवी ह्मणून होती तिचा त्यांणीं अभिप्राय घेतला. तिणेंही त्यांच्या मताप्रमाणेंच घोडे न देण्याविषयीं त्यांस सांगितलें, व या नकारावरून राजास राग येऊन त्याणें उदल व अल्ह यांच्या पराक्रमाकडे विशेष लक्ष न येतां त्यांस एकदम हद्दपार केलें. तेव्हां उदल व अल्ह हे दोघेही, 'अशा अविचारी राजाचे मुलखांत राहण्यापेक्षां हद्दपार होऊन देशांतर करणें बरें' असें ह्मणून सहकुटुंब आपल्या प्रिय मातोश्रीसह महोबा येथून निघाले. ते वर लिहिल्याप्रमाणें कनौजचा राजा जयचंद याजजवळ येऊन त्याच्या आश्रयास राहिले. त्या राजानेंही त्यांचा उत्कृष्ट सन्मान करून त्यांस आपल्या सरदारांचे पटांत दाखल केलें. ह्याप्रमाणें एकानें अपमान केला तरी दुसऱ्यानें त्यांचा आदर केला; येणेंकरून त्यांस संतोष झाला.

इकडे आपल्या चुकलेल्या लोकांची महोबाच्या राजानें अशी अशी दुर्दशा केली हें वर्तमान दिल्लीस पृथ्वीराजाला समजल्यामुळें, त्यास मोठा क्रोध येऊन त्याणें तत्काळ त्या राजावर स्वारी करण्याचा निश्चय केला व तो आपलें सैन्य घेऊन चंदेलवर येण्यास निघाला. वाटेनें चंदेल मुलखांतून जातांना पृथ्वीराजाच्या लोकांनीं बहुत गांवें लुटलीं, जाळलीं, व त्यांस अडथळा करण्याला जे राज्यरक्षक लोक आले त्यांस कापून टाकिलें.

ही धुमाळी परमाल राजास समजून ह्या अनर्थाचें कारण त्याच्या

लक्षांत आलें. तेव्हां शत्रूच्या तोंडावर लढाई देण्यास कोणाला पाठवावें हा राजाला विचार पडून त्याणें आपल्या सर्व सरदारांची सभा भरविली. परंतु त्यांजमध्यें कोणीच धैर्यवान् नसल्यामुळें पृथ्वीराजाशीं सामना द्यावा किंवा कसें अशी शंका उत्पन्न होऊन सर्व स्तब्ध बसले. तेव्हां कित्येकांनीं असें सुचविलें कीं, 'उदल व अल्ह या सरदारांवर महाराज रुष्ट होऊन त्यांस जें हद्दपार करण्यांत आलें आहे त्यांची समजूत करून सन्मानपुरःसर त्यांस घेऊन यावें; तेच या प्रसंगीं उपयोगीं पडतील.' परंतु हें ऐकून, परमाल राजाचा मुलगा युवराज ब्रह्मजित् यास ही गोष्ट पसंत पडली नाहीं व त्याणें त्यांचा निषेध केला. तो ह्मणाला, 'तुमचीं एवढालीं वयें होऊन तुह्मी इतके पोक्त झालांत; तेव्हां तुमचीं इंद्रियें शिथिल व पराक्रमशून्य झालीं असें वाटतें! रजपुतांच्या पोटीं जन्म घेऊन अशा नामर्दपणाच्या गोष्टी सांगणें ही मोठी शरमेची गोष्ट आहे! तुह्मीं आजपर्यंत जीं शौर्याचीं व कीर्तिप्रद कामें केलीं त्यांचा, कांहीं तरी अभिमान बाळगा. तुह्मी आमच्या राज्याचे कल्याणकर्ते, आमच्या राज्यमंदिराचे स्तंभ व आमच्या राज्याचे अभिमानी, तेव्हां तुह्मी जर असें मागें पाऊल घेऊन ना नू करूं लागलां तर हा अपकीर्तीचा डाग आपणा सर्वांस लागेल. मला तर अशी अपकीर्ति सहन करून जीवंत राहण्यापेक्षां रणभूमींत मरावें हें बरें वाटतें. मी पुढें निघतों, व ज्या अर्थी तुह्मी आमचे सरदार आहांत त्या अर्थीं तुह्मांस माझ्या मागें निघालेंच पाहिजे.' युवराजाचें हें आवेशाचें भाषण ऐकून सरदारांस पुनः स्फुरण आलें, व त्यांचेपैकीं एकजण पुढें होऊन युवराज ब्रह्मजित् यास ह्मणाला, 'अन्नदाते महाराज, आपण येवढी तसदी घेण्याचें बिलकुल कारण नाहीं. आपण बोललां तें सर्व योग्य व खरें आहे. ज्या अर्थीं आपल्या अन्नावर हा पिंड वाढला आहे त्या अर्थी आपले कार्यार्थच त्याचा उपयोग झाला पाहिजे. आपण कांहीं चिंता करूं नये. आपल्या पुण्यप्रतापानें आह्मी समरांत तरवार गाजवून यशस्वी होऊन येतों.' असें ह्मणून, मलखान, अरिसिंह, वरसिंह, नरसिंह, आणि जयसिंह, असे पांच सरदार पुढें होऊन, आपल्या बरोबरीचे आणखी एक हजार सरदार व आठ हजार लष्कर घेऊन पृथ्वी-

रांजाला सामना देण्याकरितां निघाले. त्या उभय पक्षांच्या सैन्यांची गांठ **सि**रसवा नांवाच्या शहराजवळ पडून लढाईस सुरुवात झाली. या लढाईत निरनिराळ्या टोळ्या करून त्यांवर एकेक सरदार नेमण्यांत आला; व त्या निरनिराळ्या टोळ्यांच्या, निरनिराळ्या नेमून दिलेल्या सामनेवाल्यांशीं लढाया झाल्या. ह्मणजे, **पृ**थ्वीराजाचे बाजूच्या एका टोळीवर **क**यमाष, तर **चं**देलच्या राजाचे बाजूच्या एका टोळीवर **म**लखान; **पृ**थ्वीराजाच्या दुसऱ्या टोळीवर **चंदपुं**डीर, तर प्रतिपक्ष्याच्या दुसऱ्या टोळीवर **न**रसिंह; व याचप्रमाणें इकडे तिसरीवर **चा**मुंडराय, तर तिकडे **ज**यसिंह; याप्रमाणें सरदारासरदारांच्या जोड्या नेमून निरनिराळे संग्राम झाले. **चंदपुं**डीरानें **न**रसिंहाचा शिरच्छेद केला तेव्हां त्याचे जागीं **व**रसिंह लढण्यास आला. परंतु त्याचीही **न**रसिंहाप्रमाणेंच रणयागामध्यें आहुति पडली. याचप्रमाणें तिसऱ्या टोळीकडे **चा**मुंडरायानें **ज**यसिंहास जर्जर केलें. याप्रमाणें **प**रमाल राजाकडे अपजयाचा वांटा येऊन त्याचे लोक बहुत पडले व चांगले चांगले सरदार ठार झाले.

ही खबर **प**रमाल राजाचे दरबारांत कळतांच तेथें मोठा विचार पडला. पुढें काय करावें याविषयीं राजा ज्याचें त्याचें मत घेऊं लागला. त्याणें आपली राणी, **कायस्थ कल्याण**, **ज**गनक **भाट**, व **के**शवदास **पु**रोहित वगैरे प्रीतींतली व विश्वासाची मंडळी बोलावून त्यांची सल्ला विचारिली. राणीनें उत्तर केलें कीं, ‘आपल्याला व युवराज **ब्र**ह्मजित् याला जी उमेद होती, ती तर समूळ नाश पावली. आतां आपले हद्दपार केलेले पराक्रमी सरदार **अ**ल्ह आणि **उ**दल या दोघांस हरप्रकारें परत बोलावून शत्रूवर जाण्याला त्यांची योजना करावी. त्यांचे वांचून आपला व आपले राज्याचा बचाव होईलसा दिसत नाहीं, व येवढ्याकरितां **पृ**थ्वीराजाकडे आणखी दोन महिन्यांची मुदत मागून **क**नौजचा राजा जयचंद याजकडून त्या उभय सरदारांस बोलावून आणावें आणि तेवढ्या अवकाशांत पुनः तयारी करावी.’ राणीचा हा अभिप्राय सर्वानुमतें पसंत पडून त्याप्रमाणें करण्याचें ठरलें. नंतर **ज**ल्हण **भाट** नांवाच्या राजाचे पदरच्या एका मनुष्याबरोबर

पृथ्वीराजाकडे मुदत मागण्याबद्दलचें पत्र पाठविलें व त्याजबरोबर अत्तर, गुलाब, विडे, बंदूक, बरची आणि दोन कच्छी घोडे असा नजराणा दिला. पृथ्वीराजानें तो नजराणा स्वीकारून परमाल राजाचे विनंतीप्रमाणें दोन महिन्यांची मुदत दिली.

ही मुदत मिळाल्यानंतर राजानें जगनक भाटाला कनौजास अल्ह व उदल या सरदारांस बोलावणें पाठविलें. त्याणें तेथें गेल्यावर त्यांस राजाचें पत्र दिलें व सांगितलें कीं, 'तुह्मी इकडे आल्यापासून राणीसाहेबांस फार वाईट वाटत आहे. वारंवार त्यांच्या डोळ्यांतून पाणी निघतें. तर तुह्मी परत येऊन पूर्ववत् महोबा नगरास स्वस्थ राहावें ह्मणजे त्यांस समाधान होईल.' यावर अल्हनेंही उत्तर दिलें कीं, 'आमच्या वडिलांनीं या राज्यरक्षणाकरितां किती पराक्रम केले व किती दुःखें सोशिलीं व त्याचप्रमाणें आह्मीही राज्यरक्षणाविषयीं किती जपत होतों हें लक्षांत न वागवितां राजानें आमचा अपमान करून आह्मांस एकदम हद्दपार केलें हें चांगलें केलें काय?' त्यावर जगनक याणें त्यांचें समाधान केलें कीं, 'ही गोष्ट चुगलखोर व मत्सरी लोकांच्या भलभलत्या सांगण्यानें राजाकडून चुकून झाली. परंतु तें आतां कांहीं मनांत न धरितां राजा व राणी यांच्या पश्चात्तापपूर्वक पुनःपाचारणाला मान देऊन परत चलावें आणि ज्या राज्यरक्षणाविषयीं तुह्मांला अभिमान आहे तें राज्यरक्षण आपल्या हातें करून यशस्वी व्हावें. हल्लीं जें राज्यावर संकट आलें आहे तें आपल्यावांचून दूर होणार नाहीं अशी सर्वांची खात्री आहे.'

जगनक याचें समाधानाचें व आग्रहाचें बोलणें ऐकून त्या दोघां भावांनीं आपल्या मातोश्रीस तो सर्व वृत्तांत कळविला व राजाचें पत्रही दाखविलें. येवढें अगत्य व आग्रह पाहून तिणेंही राजाचे बोलण्यास मान देण्याविषयीं आपल्या पुत्रांस सांगून महोबास जाण्याची सिद्धता करविली. नंतर त्या उभय बंधूनीं आपल्या नवीन आश्रयदात्या राजास जाण्याविषयीं रजा मागितली. कनौजचा राजा जयचंद हाही मोठा अभिमानी होता. त्यानें त्यांस रजा देण्याचें नाकबूल करून उलट त्यांचें मन फिरविण्याकरितां त्यांस पुष्कळ प्रकारानें बोध केला.

तो ह्मणाला, 'ज्यानें तुमचा अपमान केला, त्याजकडे पुनः जाणें चांगलें नाहीं. मीं तुमचा सत्कार केला, तुह्मांला मोठ्या नेमणुका करून देऊन सरदारांचे पटांत तुमचें नांव घातलें. याप्रमाणें झालेल्या अपमानाचें दुःख न होऊं देतां मीं जें तुह्मांस आपल्या पदरीं ठेविलें तें ह्याप्रमाणें दुसऱ्याकरितां आपल्या जीवांचे बळी देण्यास नाहीं ठेविलें.' हें भाषण ऐकून अल्ह व उदल हे तर निरुत्तर झाले. परंतु परमाल राजाकडून या उभयतांस बोलावण्याकरितां आलेल्या जगनक भाटानें पुढें होऊन जयचंद राजास लवून नमन केलें व त्याचे गुणानुवाद वर्णन करून, परमाल राजानें जयचंदास जें वेगळें विनंतिपत्र दिलें होतें तें त्याचे हातांत दिलें. तें पाहून जयचंदानें त्या उभय पराक्रमी बंधूंस सन्मानपुरःसर निरोप दिला. जाते वेळीं त्याणें त्यांस मोठाले पोषाख, मोत्यांच्या माळा, अलंकार, घोडे, शस्त्रें इनामें, वगैरे देऊन शिवाय त्यांच्याजवळ नेहमीं राहण्यास आपल्या खर्चानें आठ दहा लढाऊ सरदार आणि कांहीं लष्कर असें दिलें. त्याचप्रमाणें जगनक भाटालाही पोषाख, इनाम वगैरे देऊन त्याचा मान राखला. नंतर ते उभय बंधु जगनक भाटासह चंदेलप्रांतास येण्यास निघाले. ते महोबाजवळ आल्याची खबर राजा परमाल यास कळल्यावर तो आपली राणी, मंत्रिमंडळ, व इतर बरोबरीचे मानकरी घेऊन त्या सरदारबंधूंना सामोरा आला. राजा व राणी आपल्याला सामोरीं आलीं हें पाहून ते बंधु आपलें पूर्वीचें अपमानजन्य दुःख विसरून सानंद झाले व त्यांनीं राजाचे व राणींचे चरणीं आपलीं मस्तकें ठेविलीं. नंतर नगरामध्यें त्यांचा मोठा सत्कार झाला.

परमाल राजानें आपले पराक्रमी इष्ट सरदार आल्यावर पृथ्वीराजाकडे, 'आमची युद्धाची सिद्धता आहे' असा निरोप पाठविला. दुसरे दिवशीं दोघांकडचीं सैन्यें महोबाच्या रणांगणांत उभीं राहिलीं. या लढाईचें वर्णन चंद भाटानें फार विलक्षण केलें असून तें केवळ पौराणिक रीतीप्रमाणें झालें आहेः—

**"इतें सूर न्हावे करे दान ध्यानं, उतें अप्सरा अंग मंजंत तानं ।**
**इतें टोप टंकार सीसं उतंगं, उतें अप्सरा कंचुकी पहरी अंगं ॥**

इतें सूर मोजा बनावंत भाये, उतें अप्सरा नूपुरं पहरी पाये ।
इतें सूर राग बधे ताय तेगं, उतें अप्सरा चरनियां पहरी जंघं ॥
इतें पाघ पेचं समारंत सूरं, उतें सीस फूलं गुहावेत पूरं ।
इतें सूर मा पाखपें झलम डारे, उतें झुंड रंभा सुमांगं समारे ॥
इतें सूर सख्खं खरे खग्ग मंजे, उतें अप्सरा अंजनं नेन अंजे ।
इतें सूर ढालं बली बंध डारे, उतें अप्सरा श्रवण नाटक धारे ॥
इतें सूर दसदान हथ्थेसु कीये, उतें अप्सरा हथ्थ मेंदी सुदीये ।
इतें सूर कर केहरीनख लीने, उतें अप्सरा कंकनं पान कीने ॥
इतें सूर बरची लिये हे अम्यारी, उतें अप्सरा हाथ वरमाल धारी
इतें सूर तुलसीनकी माल नाई, उतें अप्सरा माल मोती बनाई॥
इतें सूर कर बान कबांन नाई, उतें अप्सरा चमकि नेनं नचाई ।
इतें तेम सावंत घोरे न लीये, उतें अप्सरा साज वीमान कीये॥
कही कवी चंदं निरखी स सोउ, वरने सुमाने परी सूर दोउ॥"

वरील वर्णनांत एकसमयावच्छेदेंकरून पृथ्वीवरील उभय पक्षांतील योद्ध्यांची आणि आकाशांतील अप्सरांची परस्परस्वभावास उचित अशी एकसारखी कृति वर्णिली आहे! ती अशीः—"इकडे(भूमीवर)शूर लोक युद्धास निघाले तेव्हां स्नानदान करून शुचिर्भूत होऊं लागले, तिकडे (आकाशांत)अप्सराही वीरपुरुष युद्धांगणीं पडला असतां त्यास आणण्यासाठीं मंगलस्नानें करून शुचिर्भूत होऊं लागल्या. इकडे पृथ्वीवर योद्धे मुकुट व कवच चढवूं लागले, तिकडे आकाशांत अप्सरा वस्त्र-कंचुकी परिधान करूं लागल्या; शूरांनीं पायजमे घातले, अप्सरांनीं पायांत तोरड्या घातल्या; शूरांनीं डोकीस पटके बांधिले, अप्सरांनीं आपले बुचडे बांधिले; योद्ध्यांनीं शिरपेंच धारण केले, अप्सरांनीं आपल्या बुचड्यांत नानाप्रकारचीं पुष्पें व नग घातले; सरदारांनीं आपल्या मिशा व कल्ले सरसे केले, अप्सरांनीं काजळ घालून डोळे साफ केले; सरदारांनीं ढाला घेतल्या, अप्सरांनीं कर्णभूषणें धारण केलीं, शूरांनीं हस्तिदानादि दहा प्रकारचीं दानें केलीं, अप्सरांनीं आपल्या हातांस मेंदी लाविली; लढवय्यांनीं हातांत वाघनखें घातलीं, अप्सरांनीं हातांत कांकणें घातलीं; शूरांनीं हातांत बरच्या घेतल्या, अप्सरांनीं हातांत पुष्पमाला घेतल्या; शिपायांनीं गळ्यांत तुलशीमाला घातल्या, अप्सरांनीं मोत्यांचे हार घातले; वीर धनुष्यबाण घेऊन सज्ज झाले,

त्यांणीं नेत्रकटाक्ष सज्ज केले, आणि इकडे शूर घोड्यांवर स्वार झाले, तिकडे अप्सरा विमानारूढ होऊन तयार झाल्या. याप्रमाणें, वीरपुरुष जय मिळवून यशप्राप्तीच्या इच्छेनें रणांगणांत युद्ध करावयास निघाले आणि देवांगना कोणता योद्धा समरभूमीवर पडून आपल्याला वरण्यास योग्य होतो याची वाट पहात बसल्या.'

वर लिहिल्या प्रकारची युद्धाची सिद्धता झाली. इकडे अल्ह व उदल हे पूर्वरात्रीं आपआपल्या स्त्रियांकडे जाऊन त्यांना भेटून निघाले. उदलची स्त्री त्याला ह्मणाली, 'प्राणनाथ,' आपण कांहीं फिकीर करूं नये. रणांगणीं आपण पडलां तरी आपल्याबरोबर आह्मीही सती येण्यास सिद्ध आहों; व हाच आमचा धर्म आहे!' त्या उभय बंधूंनीं शेवटीं आपली प्रिय माता देवल देवी इचा आशीर्वाद घेऊन निरोप विचारिला. तिणें त्यांच्या पाठीवरून हात फिरवून सांगितलें कीं, 'जा; धैर्यानें युद्ध करून विजयी व्हा; मागें फिरूं नका; ईश्वर तुह्मांस यश देईल.' याप्रमाणें घरच्या प्रेमाच्या मंडळीचा निरोप घेऊन तें वीरद्वय निघालें व सज्ज असलेल्या फौजेस मिळालें. परमाल राजा, युवराज ब्रह्मजित्, त्यांची पांचहजार फौज, व अल्ह व उदल यांजबरोबर जयचंद याणें मदतीस ह्मणून दिलेली फौज, अशी सर्व मंडळी समरभूमीकडे निघाली.

---

१. जुन्या ग्रंथांतून योद्धे व शूर पुरुष धैर्यशाली होण्याकरितां, त्यांना स्वर्गसुखें मिळतात, त्यांना देवांगना किंवा अप्सरा वरितात, इत्यादि वर्णनें केलेलीं आढळतात. पूर्वींच्या ऋषी वगैरेनींहीं आपल्या स्मृतिग्रंथांतून शूर पुरुषांस उत्तमलोकप्राप्ति होईल असें ठिकठिकाणीं ह्मटलें आहे:—

"द्वाविमौ पुरुषौ लोके सूर्यमंडलभेदिनौ ।
परिव्राड्योगयुक्तश्च रणे चाभिमुखो हतः ॥
यत्र यत्र हतः शूरः शत्रुभिः परिवेष्टितः ।
अक्षयाँल्लभते लोकान्यदि क्लीबं न भाषते ॥
जितेन लभ्यते लक्ष्मीर्मृतेनापि वरांगनाः ।
क्षणविध्वंसिनी काया का चिंता मरणे रणे ॥" इत्यादि.

याच प्रकारचें वरील वर्णन केलेलें दिसतें. हल्लीं अशा प्रकारचीं वर्णनें कधीं कोणी करणार नाहीं व केलीं असतां तीं हास्यास्पद मात्र होतील.

पृथ्वीराजाचें लष्करही सामन्याला तयार होऊन उभें राहिलें. पृथ्वीराजाचा चुलता कन्ह हा सर्वांच्या पुढें आपला सेनाभाग (टोळी) घेऊन आला. त्याची इभ्रत व फौज पाहून परमाल राजा घाबरून, पृथ्वीराजाशीं युद्ध करावयाचें नाहीं असा त्याणें निश्चय केला; व पृथ्वीराजाला आपलें अर्धें राज्य, पन्नास लक्ष रुपये आणि आपली कन्या अशीं देण्याचें ठरविलें. परंतु हा भीरुपणा युवराज ब्रह्मजित्, अल्ह व उदल या तत्पक्षीय वीरांस बिलकुल न आवडून, पृथ्वीराजाशीं युद्ध करावयाचेंच असा त्यांचा कृतनिश्चय झाला. ते ह्मणाले, या धडावर शिर असेपर्यंत शत्रूला शरण जाऊन आत्मसंतोषानें राज्य व खंडणी ह्मणून आह्मी बिलकुल देऊं देणार नाहीं. आमच्या पश्चात् आमचें सर्वस्व जरी शत्रूला मिळालें तरी मिळो. आह्मी येथलें राज्य मुकून समरांत पडलों तरी आह्मांस स्वर्गींचें अक्षय राज्य मिळेल. यांत काय आमचा तोटा आहे?' तेव्हां परमाल राजा भयत्रस्त होऊन आपलें सैन्य व लोक सोडून लागलाच तेथून पळून कलंजर किल्ल्यांत जाऊन लपून बसला.

परमाल राजाच जेव्हां किल्ल्यांत जाऊन लपून बसला तेव्हां अल्ह याणें युवराज ब्रह्मजित् यास सांगितलें कीं, 'तुह्मी अल्पवयी सोळा वर्षांचे आहांत, येवढ्याकरितां तुह्मीही आमच्याबरोबर रणकंदनांत आपल्या जीवाचा बळि देण्यास कशाला येतां? तुह्मी आपल्या पित्याबरोबर कलंजर किल्ल्यांत स्वस्थ बसा व आह्मी मारतों का मरतों हें तेथून पहा.' परंतु यावर त्या कुलावतंस क्षत्रियपुत्रानें उत्तर दिलें कीं, 'असें करून नरकांत जाण्याची माझी इच्छा नाहीं. अशी नीति आहे कीं:—

> "राजा घर जात जु मरे करे सुरगको भोग ।
> दुनियामें जस विस्तरे हसे न दुरिजन लोग ॥
> जा धरतीकुं खायकें मरे न जाते कोय ।
> अंतकाल नरकही परे जुगमें अपजस होय ॥"

ह्मणजेः—'रणांगणीं क्षत्रियांनीं आपले प्राण दिले असतां स्वर्गसुखप्राप्ति होऊन दुनियेंत कीर्तिप्रसार होतो व दुष्ट लोकांसही हंसावयाला फावत नाहीं. या मृत्युलोकीं जन्मास येऊन मरण कोणाला सुटलें

आहे ? व अशा प्रकारें जगून अंतकाळीं नरकवास व आपल्या पश्चात् अपकीर्ति हे सोहाळे भोगावयाचे, त्यापेक्षां समरांत देह पडलेलाच काय वाईट ?' आणखी तो ह्मणाला कीं, 'मी असा भागूबाईसारखा लपून बसून आयुष्य कंठणारा नव्हें. तुह्मीच बघाल कीं, माझा पराक्रम कसा काय आहे तो.' असें ह्मणून जो त्याला आवेश आला तो एकदम शत्रूंवर तुटून पडला. कन्ह चव्हाण चंदेलच्या फौजेवर पडला; नीरधरराय व कनौजवाल्या फौजेचा मुख्य लाखनसी हे परस्पर सामन्याला उभे राहिले. मागाहून नीरधररायाला कन्ह, कयमाष, सलख, पजून, पहाड, इत्यादि चव्हाणपक्षीय सरदार मदतीला आले व लाखनसी याला तालनखां, रूपसी, मोरी, हुद जाधव, कुमारपाळ, वगैरे अल्हपक्षीय सरदार साह्यार्थ आले. चव्हाणपक्षीयांचा अल्हपक्षीयांवर मोठा मार पडून हजारों वीर रणांत पडले. त्यांतच तालनखां पठाणही पडला. तालनखां पडल्याबरोबर कनौजवाली फौज गतधैर्य होऊन मागें हटली, व मार्ग सांपडेल तिकडे पळूं लागली. ही वाताहत पाहून लाखनसी पुढें आला आणि त्याणें सर्वांस धीर व दम देऊन सांगितलें कीं, 'रणभूमीवर आपले देह पाडून स्वर्गसुख भोगावयाला पात्र व्हावयाचें तें सोडून षंढासारखे शत्रूला पाठ दाखवून चाललांत, ह्याची तुह्मांला लाज कशी वाटत नाहीं ? ह्या नीचपणाच्या व नामर्दपणाच्या कृत्याबद्दल तुह्मांला धिक्कार असो.' असा त्यांचा कांहींसा निषेध करून व कांहीं उमेद देऊन त्यांस पुनः सामनेवाल्यांस तोंड देण्याचें अवसान आणिलें. ते पुनः पुढें सरसावून नेटानें युद्ध करूं लागले तों त्यांचा धीरस्तंभ लाखनसी सरदारच शत्रूकडच्या गदाप्रहारानें पडला. त्याचे मस्तकावर जे गदाप्रहार झाले त्यांचे योगानें त्याचे तुकडे झाले ! याचप्रमाणें तिकडे चव्हाणपक्षाकडे नीरधररायही मूर्च्छित होऊन पडला. अल्हपक्षीय भगवानसिंह याचे डोक्यावर कन्ह चव्हाणानें सांग मारल्यामुळें तो मरून पडला. त्यामुळें कन्हावर बाबु कंठेरी, नारणदास आणि नरबद असे तिघेजण चवताळून आले, व त्यांनीं त्यास घेरून टाकिलें. परंतु त्या तिघांसही कन्हानें चित केलें. याशिवाय कनौजचे फौजेचा संजमराय, चा-

मुंडराय व चंद पुंडीर यांणीं धुवा उडविला व तिकडील पुष्कळ मोठमोठे वीर पडले. जयाची बाजू चव्हाणपक्षाकडेच दिसूं लागली. आपल्या साह्यार्थ आलेल्या कनौजच्या फौजेची अशी दुर्दशा पाहून चंदेलपक्षीय मुख्य सरदार अल्ह व उदल हे उभयतां केशरी पोषाख करून रणांत शिरले. त्यांणीं पहिल्या सपाट्याबरोबर संजमराय यास हाणून पाडिलें. तो मूर्च्छागत होऊन पडला, व पुनः सावध होऊन उठतो तों देवकर्ण पुढें येऊन त्याणें त्याच्या माथ्यावर गदेचा टोला मारिला. शिवाय शत्रूकडून येणाऱ्या बाणांचा वर्षाव त्याजवर होतच होता, त्याखालीं संजमराय वीराच्या चिंध्या उडाल्या.

संजमराय वीराचा निकाल लाविल्यानंतर उदल याची स्वारी कन्ह चव्हाणावर आली आणि त्याणें त्यास मूर्च्छित केलें; व दुसरा एक गदाप्रहार करून उदल हा कन्हाचा कपाळमोक्ष करणार तों त्याच्या साह्याला कयमाष आल्यामुळें उदल याची गदा कयमाष याचा समाचार घेण्याकडे गुंतली. त्याणें कन्हावर उगारलेली गदा तशीच कयमाषावर हाणली. त्याबरोबर तोही मूर्च्छागत होऊन पडला. तितक्यांत नन्ह पडिहार हा चव्हाणपक्षीय सरदार उदलवर चालून आला. त्याशीं उदल झटापटी करतो आहे तों तिकडे कन्ह व कयमाष पुनः सावध होऊन नन्हाला येऊन मिळाले आणि त्या तिघांनीं मिळून उदल याजवर तिहींकडून हल्ला करून धडापासून त्याचें मस्तक उडविलें. तरी, उदल हा आपल्या पूर्ण आवेशांत असून युद्ध करीत असल्यामुळें, त्याचें शिर उडून गेलें तरी त्याचें कबंधच रणांगणांत हाणाहाणी करीत सुटलें; व त्या कबंधानेंच कित्येक वीर चित केले!

उदल हा मोठा शूर व अभिमानी वीर होता; चंद भाट हा प्रस्तुतचा ग्रंथकार असून तो या युद्धांत हजर होता; व तो पृथ्वीराजाच्या पक्षाचा असल्यामुळें त्याला अनुकूल तेवढें विशेषेंकरून लिहिण्याचें त्याचें धोरण दिसतें; तरी त्याणें उदल याचे अपूर्व शौर्याविषयीं असें लिहिलें आहे—

> 'तीनु मिलके मारियो रणजसराजकुमार।
> मारे भर पृथिराजके शिरबिन एक हजार॥'

यांत **चंदाची** त्याच्या सांप्रदायिक वर्णनाप्रमाणें अत्युक्ति आहे. ह्मणजे **चंद** ह्मणतो कीं, तिघांनीं मिळून त्या रणशूर **उदलाला** मारिलें खरें, पण त्याच्या कबंधानें **पृथ्वीराजाचे** एक हजार लोक ठोकले!' एकंदरींत **उदल** हा वर्णनीय व पराक्रमी वीर होता.

**उदल** याच्या शिरच्छेदाचें वृत्त त्याचा प्रिय भ्राता **अल्ह** यास कळल्याबरोबर तो क्रोधायमान होऊन त्याचा संताप अनावर झाला. त्यानें तत्काळ मोहनास्त्र टाकून.सर्वांस बेशुद्ध केलें. त्यामुळें सैन्यांतील लोकांचीं अवसानें सुटून ते **अल्हकडून** कापले गेले. ह्याप्रमाणें पूर्वींचें धोरण सर्व फिरून **पृथ्वीराजास** अपजय मिळणार असें सर्वांस वाटूं लागलें. तेव्हां **पृथ्वीराजास** मोठी चिंता पडून त्याणें **चंद भाटास** 'त्या अस्त्राचा प्रभाव काय? ह्मणून विचारिलें. **चंदानें** सांगितलें कीं, **अल्ह** यास हें मोहनास्त्र **गोरखनाथाकडून** मिळालें आहे. तो प्रकार असा:—एकदां **अल्ह** हा शिकारीला गेला असतां रस्ता चुकून एका डोंगरावर गेला. तेथें **गोरखनाथ** तपस्याचरण करीत बसला होता. त्याची **अल्ह** याणें एक वर्षभर एकनिष्ठेनें सेवा केल्यामुळें त्याणें **अल्ह** यास अमरत्व दिलें, व त्याचप्रमाणें ज्या अस्त्राचा हल्लीं त्यानें प्रयोग करून आपल्या सैन्यास निद्रावश करून टाकिलें, तें मोहनास्त्रही दिलें. त्या वेळीं **अल्हनें गोरखनाथाबरोबर** राहण्याची इच्छा दर्शविली. पण **नाथानें** सांगितलें कीं, 'तुझा भाऊ **उदल** जगतावर जीवंत असेपर्यंत तूं त्याजबरोबर ऐस. मग माझें स्मरण कर ह्मणजे मी तुझा हेतु शेवटास नेईन.' ही हकीकत ऐकून **पृथ्वीराज** ह्मणाला, 'असें जर आहे तर **अल्हवर** आपला जय होण्याची आशा नाहीं.' **चंद** ह्मणाला, 'यावर आपणही एक प्रयोग केला ह्मणजे आपणाला यश मिळेल. **शंकराच्या** गणांपैकीं **आतताई** ह्मणून एक गण आहे, त्याची आराधना केली ह्मणजे **अल्हाचा** प्रभाव फिका पडेल.'

नंतर **चंदानें कालिकेचें** ध्यान करून तिला प्रसन्न केलें. तेव्हां तिनें मोठ्यानें गर्जना केली. त्याबरोबर सर्वांची बेशुद्धि जाऊन लोक सावध झाले, व तिचे मागून **आतताई** प्रकट होऊन लढाई झाली. मध्यें उभय पक्षांकडील सरदारांच्या चकमकी व हाणामाऱ्या झाल्या.

आततायी व अल्ह हे दोघे झुंजूं लागले, व पुढें दोघेही घायाळ होऊन पडले. इतक्यांत पृथ्वीराजानें ब्रह्मजित् यास ठार मारलें. तों अल्ह सावध होऊन उभा राहिला व त्यानें पुनः मोहनास्त्र टाकिलें. त्यामुळें पृथ्वीराजाकडचे सरदार पुनः निद्रावश झाले. त्यावर पुनः त्याणें अभ्यस्त्र टाकिलें. त्या वेळीं रामगुरु पुरोहित व चंद भाट हे पुढें होऊन लढूं लागले. तेव्हां अल्ह याणें गोरखनाथाचें ध्यान केलें व चंद भाटानें देवीचें ध्यान केलें, व तीं दोघेंही प्रकट झालीं. नाथानें अल्ह यास सांगितलें कीं 'तूं क्षत्रियपणाचा बाणा राखिलास. पण तुझ्याकडून ब्राह्मण व भाट यांजवर जय मिळविण्याचें कृत्य होणार नाहीं. येवढ्याकरितां आतां हा रक्तपात पुरा करून मजबरोबर चल. तूं अमर आहेस.' नाथगुरूचें सांगणें सच्छात्र अल्ह यानें मानून हातांतलें शस्त्र टाकून दिलें व तो समरभूमींतून एकदम गोरखनाथाबरोबर चालता झाला.

या लढाईंत पृथ्वीराजास जखम लागून तो मरणोन्मुख होऊन प्रेतांच्या ढिगांत पडला होता. त्या प्रेतांचें मांस वगैरे खाण्यास व त्यांना तोडण्यास गृध्रपक्षी आणि घारी यांचीही गर्दी झाली होती. त्यांतच एक घार पृथ्वीराजाचे डोळे फोडण्यास आली. तिला हांकून देण्याचें सामर्थ्य पृथ्वीराजाला नव्हतें. तों त्याचे जवळच संजमराय हा शूर सरदार असाच घायाळ होऊन पडला होता. त्याणें त्या घारीचा दुष्ट प्रकार पाहिला. तेव्हां लागलाच त्याणें आपल्या शरीराचा एक तुकडा तोडून त्या खादाड व बुभुक्षित गिधाडास टाकला. त्याबरोबर ती घार पृथ्वीराजाचे डोळे न फोडतां त्या मांसाच्या तुकड्याकडे धांवली व तो तुकडा घेऊन चालती झाली. येणेंप्रमाणें पृथ्वीराजावरील संकट टळलें. परंतु संजमरायाचें लवकरच प्राणोत्क्रमण होऊन त्याचा आत्मा शूर व वीर पुरुषांच्या आत्म्यांबरोबर स्वर्गसुख भोगण्यास गेला. कोणी ह्मणतात, संजमराय सदेह वैकुंठास गेला. त्याच्या वरील कृत्यावरून

---

१ हिंदुस्थानांत 'अल्ह-उदलच्या लढाईचें पुस्तक' छापलेलें प्रसिद्ध असून तें तिकडे सर्वत्र वाचिलें जातें व उत्तरेकडे तें प्रत्येक शहरीं व स्टेशनावर विकत मिळतें.

तो मोठा धीराचा व स्वामिकार्यतत्पर असा होता असें उघड दिसतें. इतक्यांत **रामगुरु पुरोहित** व **चंद भाट** असे उभयतां येऊन त्यांनीं औषधोपचारांनीं **पृथ्वीराजास** सावध करून आपल्या गोटांत नेलें. **चामुंडराय** याणें **कलिंजर** किल्ल्यावर **परमाल** राजा लपून बसला होता त्याजवर स्वारी करून त्यास धरून आणिलें; व त्या किल्ल्यांतून सात कोटी रुपयांची लूट आणिली. नंतर कोण कोण वीर पडले होते याची तपासणी चालविली. **संजमराय** तर सदेह स्वर्गलोकीं गेला. बाकी **कयमाप, कन्ह, पंजून, जैत, नरसिंह, जाम, नीरधरराय, पहाड, चंद पुंडीर, धीर पुंडीर, खेतो खेंगार, गंभीरहार** इत्यादि शूर व महारथी पुरुष अचेतन होऊन रणांगणांत पडले होते. त्यांवर **रामगुरूंनीं** संजीवनी मंत्रानें पाणी शिंपून त्यांस शुद्धीवर आणिलें. शेवटीं, **परमाल** राजास पदच्युत करून **चंदेलचे** राज्यावर **पंजून कच्छवाह** यास बसविलें व **पृथ्वीराज** जयजयकार करित आपल्या सर्व सैन्यासहवर्तमान **दिल्लीस** परत आला. येणेंप्रमाणें **महोबाचे** लढाईचा शेवट झाला.

---

## प्रकरण पांचवें.

कनोजचा राजा जयचंद.—त्याचा राजसूययज्ञाचा बेत.—त्याला सुमतिप्रधानाची हरकत.—राजसूययज्ञाची तयारी.—पृथ्वीराजाची यज्ञास प्रतिकूलता.—पृथ्वीराजाचे पारिपत्यार्थ वालुकारायाची योजना.—पृथ्वीराजाचा जयचंदास विघ्न करण्याचा विचार.—वालुकारायावर कन्ह चव्हाणास पाठवितात.—कन्हाचें व वालुकारायाचें युद्ध व त्यांत वालुकारायाचा मृत्यु.—राजसूययज्ञास विघ्न व त्याची असांगता.—राजकन्या संयोगता.—तिला सखीचा उपदेश.—वसंतवर्णन.—संयोगतेचें उत्तर.—जयचंदाचा कन्या संयोगतेच्या हट्टासंबंधानें खेद.—संयोगतेला सखीचा पुनरुपदेश.—संयोगतेचा शेवटचा जबाब. कन्येच्या सुधारण्याविषयीं जयचंदाचा निरुत्साह आणि संयोगतेला बंदी.

---

ह्याप्रमाणें **पृथ्वीराज** विजयी झाला व त्याची दिगंत कीर्ति झाली. तो एवढा पराक्रमी असून त्याचें राजधानीचें नगर-**दिल्ली** शहर-

येवढें मोठें होतें कीं, त्याच्या ऐश्वर्याची बरोबरी करणारा या **भरत**-**भूमी**वर कोणी नसेल असें लोकांस साहजिक वाटत असे. परंतु "शेराला सव्वा शेर" या ह्मणीप्रमाणें पृथ्वीवर कोठेंनाकोठें तरी अभिमान खाली करावयासारखें ठिकाण असतेंच असा नियम आहे. **पृथ्वीरा**-**जा**ला समकालीन असा **जयचंद राठोड** नांवाचा **कनौज** येथें एक राजा होता. त्याचें पराक्रमैश्वर्य व त्याची श्रीयुतनगरी यांजपुढें **पृ**-**थ्वीराजा**चें तेज, बल व ऐश्वर्य हीं तुच्छ होतीं. त्याचे बरोबरीला या **भरतखंडां**त एकही राजा नव्हता. '**राजस्थानचा इतिहास**' लि-हिणारे **कर्नल् टॉड्** साहेब हे लिहितात कीं, '**जयचंद राठोड** याच्या राजधानीचें नगर जें **कनौज**[1] हें हल्लींच्या **लंडन** नगरीसारखें पंधरा कोश लांबरुंद वसलेलें होतें.' त्या शहरांत नुस्तीं तांबोळ्यांचींच दु-कानें तीस हजार होतीं! **चंद भाट** ह्मणतो, 'या **जयचंद** राजाचें लष्कर ऐशीं लाख होतें; व त्यावरून त्यास "**दळपांगळा**" असें नांव पडलें होतें. ह्मणजे, याचें लष्कर एकदां निघालें असतां मागच्या लोकांस बहुतकाळपर्यंत तसेंच अडकून रहावें लागे!'

हा **जयचंद** राजा एके दिवशीं आपलें बल आणि संपत्ति यांचेवि-षयीं विचार करीत बसला असतां त्याला आपण स्वतः **रामचंद्र** किंवा **युधिष्ठिर** यांच्याप्रमाणें आहोंत असें वाटून, त्यांचेप्रमाणें जगावर कांहीं तरी कीर्तिप्रसारार्थ **राजसूययज्ञा**सारखें पुण्यप्रद महत्कृत्य करावें असा त्यानें विचार केला. त्याची महत्वाकांक्षा अशी होती कीं, 'सर्व यज्ञ-

---

१. हें जंगी शहर गंगेचे कांठीं अंतर्वेद ह्मणून आहे त्यांत वसलें असून तें हल्लीं मोडकळीस आलें आहे. कनौजच्या गुलाबी वगैरे अत्तरांची फार प्रसिद्धि आहे. या शहरच्या ब्राह्मणांस 'कनोजिया ब्राह्मण' ह्मणतात. त्यांचीं आडनांवें मिश्र, पांड्ये, दीक्षित, वनवडे, वगैरे आहेत. या कनोजी ब्राह्मणांपासूनच दशविध ब्राह्मण झाले असें वचन आहे:—

'सर्वे विप्राः कान्यकुब्जा मागधं माथुरं विना ।'

ह्मणजे, सर्व ब्राह्मण कनोजी ब्राह्मणांपासून झाले. मात्र गयावळ (मागध) आणि चोबे (माथुर) हे खेरीज. गयावळ हे ब्राह्मण जरासंधनिर्मित असून चोबे हे कंसनिर्मित आहेत असें ह्मणतात.

समारंभांत यज्ञमंडपामध्यें जीं कांहीं लहानमोठीं कामें पडतील तीं सर्व जिंकून वश केलेल्या राजेलोकांकडून करवावयाचीं. झाडणार, सारवणार व उष्टीं काढणार देखील राजेलोक नेमावयाचे. या यज्ञाकरितां एक लाख तोळे सोनें, साठ भार मोत्यें, एक कोटी भार रुपें, आणि इतर धातु व सामग्री यांची तर परिमितिच नाहीं, इतकी तयारी करविण्याची त्यानें व्यवस्था चालविली. पांडवांचे पश्चात् राजसूययज्ञासारखें कृत्य विक्रमादित्यासारख्याकडून देखील झालें नाहीं. विक्रमानें आपला शक स्थापित केला ही गोष्ट वेगळी. परंतु त्याच्यानें सुद्धां जो यज्ञ करवला नाहीं तो यज्ञ करण्याचा जयचंद राजानें निश्चय केला. शिवाय त्यानें असाही विचार केला कीं, 'यज्ञसमाप्तीनंतर आपली कन्या संयोगता हिचें स्वयंवर करून योग्य वरासह तिचें लग्न करून टाकावें.' या दोन्ही हेतूंकरितां त्यानें सर्व भरतखंडांतील राजांस आमंत्रणपत्रें लिहिलीं. जयचंदाचा सुमति नांवाचा प्रधान होता. त्यानें, 'राजसूययज्ञ होणें असंभाव्य असून तो करण्यांत यश मिळणार नाहीं,' असें राजास सांगितलें. तो ह्मणाला, 'कलियुगांत कधींही हा यज्ञ कोणीं केला नाहीं व करण्याविषयीं निषेध आहे; शिवाय हा यज्ञ करणें ह्मणजे कांहीं स्वेच्छेचें कृत्य नाहीं. याजमध्यें मोठमोठीं विघ्नें व संकटें उद्भवून तो सिद्धीस जाण्याचें कठीण आहे. कीर्तिप्रसाराला दुसरीं अनेक कृत्यें व अनेक मार्ग आहेत.' परंतु जयचंदानें हें सुमतीचें बोलणें ऐकून आपल्या ऐश्वर्यबलाचे तोऱ्यांत त्याचा निषेध करून ह्मटलें कीं, 'तूं लोभिष्ठ असून नामर्द आहेस' ह्मणून अशा नेभळेपणाच्या गोष्टी सांगतोस. माझा निश्चय कदापि फिरणार नाहीं. माझा बेत नक्की ठरला आहे. यास अडथळा आणण्याचें तुला प्रयोजन नाहीं.'

आपलें बोलणें राजाला रुचत नाहीं हें पाहून सुमति स्तब्ध झाला. नंतर जयचंदानें सर्व भरतखंडस्थ राजांना आपल्या राजसूययज्ञाचीं प्रसिद्धिपत्रकें आणि निमंत्रणचिठ्ठया पाठविल्या व तीं बघून सर्व राजे हजर झाले. ते आल्यानंतर त्यांजकडे त्यांच्या त्यांच्या योग्यतेचीं अशीं यज्ञमंडपांतलीं कामें सोंपविलीं. याप्रमाणें राजरूप मौक्तिकहारांनीं अ-

यचंद हा सार्वभौम राजासारखा शोभूं लागला. परंतु या मुक्ताहारांत दोन मोत्यांचे दाणे आले नाहींत. ते दोन दाणे **पृ**थ्वीराज **च**व्हाण व **सम**रसिंह **रा**वळ हे होते. सर्व राजे आपापल्या शक्तीप्रमाणें यज्ञसमारंभार्थ भेटी व नजराणे घेऊन आले असतां वरील दोघे राजे आले नाहींत हें पाहून **ज**यचंदास मोठा राग येऊन त्यानें त्यांजकडे पुनः दूत पाठविले. त्यांत **पृ**थ्वीराजाकडे जो दूत पाठविला त्याजबरोबर असा निरोप पाठविला कीं, 'तुह्मीं रीतीप्रमाणें यज्ञसमारंभार्थ हजर व्हावें; नाहीं तर राज्य खाली करून द्यावें. आणि हें आमंत्रण पोहोंचल्याबरोबर इकडे निघून आल्यास तुह्मांकरितां यज्ञमंडपांत द्वारपाळाचें काम राखून ठेविलें आहे, तें तुह्मीं हातांत छडी घेऊन करावें.'

दूतानें **दि**ल्लीस येऊन **पृ**थ्वीराजाच्या सभेंत **ज**यचंदाचा निरोप अक्षरशः सांगितला. तो ऐकून **पृ**थ्वीराजानें डोळे लाल केले आणि त्याच जासुदाबरोबर **ज**यचंदास परत निरोप पाठविला कीं, 'पूर्वीं **स**त्ययुगांत **ब**लीनें यज्ञ केला तेव्हां त्यानें पृथ्वीदान केलें; **त्रे**तायुगांत **राम**चंद्रानें यज्ञ केला तेव्हां त्या समारंभाकरितां धनाधिपति **कु**बेर आला होता; आणि **द्वा**परयुगांत **यु**धिष्ठिरानें यज्ञ केला तो, त्याचे **भीमा**र्जुनासारखे पराक्रमी भ्राते असून श्री**कृ**ष्णासारखे मित्र होते ह्मणून झाला व ते यज्ञ त्यांस शोभले व साधले. ती शक्ति व तें सामर्थ्य **ज**यचंद **रा**ठोडासारख्या राजामध्यें नसून केला तर माझ्यासारख्या **च**व्हाणकुलीन पराक्रमी राजानेंच करावा. मीं **दि**ल्लीवर स्वारी करणाऱ्या **शा**हाबुद्दीनासारख्याला कैदेंत टाकिलें; व **गु**र्जराधिपति **भी**मदेवाला मारिलें; तेव्हां असला यज्ञ करणें तर मलाच शोभेल. इतरांची हा यज्ञ करण्याविषयीं शक्ति नाहीं.' **पृ**थ्वीराजाचें हें उत्तर दूतानें **ज**यचंदास कळविलें. तें ऐकून तो संतप्त झाला व 'अत्तांचें अत्तां त्याला पकडून आणा' असा त्याणें हुकूम फर्माविला तेव्हां **ज**यचंदाचा बंधु **वा**लुकाराय ह्मणून तेथें होता त्यानें उठून राजास नमन केलें; आणि 'पृथ्वीराजास अत्तां कैद करून आणितों' अशा प्रतिज्ञेचा विडा उचलिला. **ज**यचंदानें त्याजबरोबर **खु**र्शानखान ह्मणून एक सरदार व **बं**दातमीर नांवाचा एक जमादार आणि साठ हजार फौज अशीं त्याचे

साह्यार्थ देऊन त्याला पृथ्वीराजावर पाठविलें. परंतु हें कृत्य होण्यास कांहीं अवकाश लागेल, आणि यज्ञाचा मुहूर्त तर अगदींच येऊन ठेपला, असें बघून यज्ञांत द्वारपालत्व तर कोणीं पतकरलें पाहिजे व तें काम पृथ्वीराजाकडे नेमिलें होतें, ह्मणून हातांत छडी धरिलेली अशी एक सोन्याची प्रतिमा करून तिला 'पृथ्वीराज' हें नांव दिलें आणि ती प्रतिमा यज्ञांतील द्वारपालाचे जागीं ठेविली.

इकडे वालुकाराय जो सैन्य घेऊन निघाला तो खोकंद शहरावर छावणी करून राहिला; कीं, यज्ञसमारंभास विघ्न आणण्याकरितां पृथ्वीराज निघाला तर त्यास तेथें धरून कैद करून न्यावयाचा. वालुकाराय सैन्य घेऊन खोकंद शहरावर येऊन उतरला असून जयचंदानें यज्ञमंडपांत आपली सोन्याची मूर्ति करून द्वारपाळाचे ठिकाणीं बसविली आहे, वगैरे सर्व वर्तमान पृथ्वीराजास समजलें, तेव्हां त्याचें मस्तक फिरून गेलें. त्यानें आपल्या सामंतांची (मंत्रिमंडळांची) सभा भरवून त्यांजपुढें प्रश्न काढिला कीं, 'या कृत्याबद्दल जयचंदाचें पारिपत्य कोणत्या उपायांनीं करावें ? मीं जो त्याचे जासुदाबरोबर निरोप पाठविला, तो केवळ तुह्मां सर्वांच्या जोरावर आणि पराक्रमावर भरंवसा ठेवून पाठविला. माझी अब्रू आणि माझा अभिमान काय तो तुह्मांवर अवलंबून आहे. तेव्हां तुह्मी जशी सल्ला द्याल त्याप्रमाणें व्यवस्था करितां येईल.' पृथ्वीराजाचा हा प्रश्न ऐकिल्यानंतर त्या सभेंत अनेकांचीं अनेक मतें निघालीं. गोविंदराय गेहेलोट व कन्ह चव्हाण यांनीं सांगितलें कीं, 'आतां विचार कसचा ? एकदम चाल करून जाऊन कनौज लुटून आणावें.' जाम यादव ह्मणाला, 'एकदम कनौजवर हल्ला करून यश मिळेलसें वाटत नाहीं. तर त्याचे भोंवतालच्या प्रदेशांत उपद्रव करून जयचंदाला विघ्न आणावें.' चंद पुंडीर ह्मणाला, 'याविषयीं कयमाष प्रधानजींना सल्ला विचारा. कारण, पूर्वीं जीं मोठमोठीं कामें आपण केलीं तीं सर्व कयमाष प्रधानजींच्या विचारेंच केलीं आहेत.' तेव्हां पृथ्वीराजानें कयमाषाला सल्ला विचारिली. तो ह्मणाला, 'क्षत्रियपुत्रांनीं तोंडांतून जें वचन काढिलें असेल किंवा जी प्रतिज्ञा केली असेल ती सत्य

करणें, नाहीं तर तत्प्रीत्यर्थ प्राण देणें, हें क्षात्रवंशाचें ब्रीद व धर्म आहे. तथापि, सत्यप्रतिज्ञ होण्याकरितां, पतंग जसा दीपज्योतीवर अविचारानें झडप घालून आपल्या प्राणांची हानि करितो तसला अविचार ज्ञानवान् क्षात्रकुलीनांनीं करावा हें मला पसंत नाहीं. जयचंदाचे पदरीं ऐशीं लक्ष सैन्य आहे, इतकेंच नाहीं, तर त्याच्या सेवेस सर्व भरतखंडांतील राजे व त्यांचें निरनिराळें सैन्य आहे. येवढ्या सैन्योदधीपुढें आपलीं मूठभर माणसें जाऊन काय पराक्रम करतील तो दिसतोच आहे. आपल्याला यश मिळालें नाहीं ह्मणजे त्यांत आपण मारले जाऊं किंवा पकडले जाऊं; आणि असें झालें ह्मणजे उलट आपण दुस्मानांच्या कीर्तिप्रसारास जास्त कारण झालों असें होईल. तर असें न करितां, माझी मसलत आपल्याला ऐकणें असेल तर असें करावें कीं, कोणीकडून तरी जयचंदाचे राजसूययज्ञास विघ्न आणण्याकरितां, जयचंदाचा भाऊ वालुकाराय जो खोकंदवर येऊन तळ देऊन बसला आहे त्याचा शिरच्छेद करावा ह्मणजे झालें. तेणेंकरून जयचंद यज्ञ बंद करून पुढच्या तजविजीस लागेल व आपला हेतु सिद्ध होईल. वालुकाराय खोकंदावर जो येऊन उतरला आहे त्याचेजवळ काय तें साठ हजारच लष्कर आहे व तेवढ्यास आपलें सैन्य पुरून उरेसें असून तेवढ्यांत आपला कार्यभाग उरकण्यासारखा आहे. आपल्या मुखांतून फक्त 'तुला यज्ञ करणें योग्य नाहीं,' येवढेंच निघालें आहे व तेवढें सिद्ध करण्यास इतकें कृत्य बस्स आहे.'

कयमाष प्रधानाचें हें बोलणें राजास व सर्व मंत्रिमंडळास पसंत पडून खोकंदवर जाण्याच्या तयारीकरितां सैन्यास सूचनेचा सिंहनाद केला. कन्ह चव्हाण हा सेनानायक होऊन त्याजबरोबर सत्तर हजार फौज निघाली. सेनापति आणि सरदार यांनीं आपल्या दळभारांसह निघतांना साधु व साध्वी यांचे आशीर्वाद घेतले, व सर्व सैन्य वालुकारायावर निघालें. तेव्हां गृध्रादि मांसाहारी पशुपक्ष्यांस, 'आतां आपल्याला यथेच्छ मांसभोजन मिळेल' ह्मणून महदानंद झाला; भूतें, पिशाच्यें, हडळी, आणि राक्षस हर्षानें नाचूं बागडूं लागले; आणि आकाशांत विजयी पक्षावर पुष्पवृष्टि करण्याकरितां अप्सरांची दाटी

झाली. **वालुकाराय** बत्तीस हजार फौजेसहवर्तमान **पृथ्वीराजाचे** सैन्यास सामना देण्याकरितां पुढें आला. घोडेस्वारांशीं घोडेस्वार, हत्तींशीं हत्ती आणि पायदळाशीं पायदळ झुंजूं लागून कापाकापी चालली. तुंबळ युद्ध चाललें. इतक्यांत **वालुकाराय** तरवार पडताळून **कन्हावर** तुटून धांवला. तों **कन्हानें** त्याजवर आपली बरची दुरूनच अशा नेमानें आणि जोरानें फेंकली कीं, ती **वालुकारायास** भेदून आरपार निघून गेली आणि **वालुकाराय** तेथेंच मरून पडला! या लढाईत **वालुकारायाचें** पांच हजार सैन्य पडलें, व **पृथ्वीराजाचे** पक्षाकडील सातशें लोक पडले. शेवटीं **पृथ्वीराजाचा** पक्ष विजयी होऊन ते **दिल्लीस** परत आले.

**वालुकारायाचे** वधाची आणि आपल्या सैन्याच्या पराजयाची खबर **कनौजास** पोंचून **जयचंदास** कळतांच त्याचें अंतःकरण अत्यंत अस्वस्थ झालें. **वालुकाराय** ह्मणजे जयचंदाचा भाऊ असून, भावाचाच ज्याअर्थी वध झाला त्याअर्थी **जयचंदाचे** याज्ञिक कृत्यास विघ्न आलें इतकेंच नव्हे, परंतु या यज्ञसमारंभाचे कार्यांतच त्याचे कन्येच्या स्वयंवराचें काम उरकावयाचा जो त्याचा बेत होता तोही तसाच राहिला. **जयचंदाची** ही उपवर कन्या पूर्वी अप्सरा असून तिणें एका ऋषीला छळिल्यावरून त्यानें तिला शाप दिला होता कीं, 'तूं पृथ्वीचा भार दूर करण्याकरितां **जयचंदाचे** घरीं जन्म घेशील आणि, तुझ्या लग्नसमयीं तुझ्या पतीच्या आणि पित्याच्या अशा उभय कुलांचा नाश होईल,' अशी कथा आहे. **जयचंदानें** ही कन्या **कहर कंठीर** नांवाच्या तरुण वरास देण्याचें योजिलें होतें परंतु ऋषीनें दिलेला शाप सत्य व्हावयाचाच; व हिच्या लग्नानें पति व पिता यांच्या कुलाचा नाश व्हावयाचा होता. योजिलेला वर कन्या **संयोगता** इला पसंत न पडून तिनें त्यास वरण्याचें नाकारिलें. तेव्हां **जयचंदानें** तिच्या मनांत तरी काय आहे, हें समजून घेण्याकरितां तिची एक समवयस्क सखी तिजकडे पाठविली. तों ती तरुण कन्या विरहानें तळमळत पडली असून तिचें भान ठिकाणीं नाहीं असें सखीला आढळलें. त्या वेळीं वसंतऋतु लागला होता. त्या ऋतूवरच एक कवित रचून तें तिजकडून

सखीनें ऐकविलें. तें कवित **चंद भाटानें लिहिलें** आहे, त्याचा भावार्थ इतकाच कीं:—"पुष्पामध्यें भ्रमर बसले असून सुगंध घेत आहेत; चंद्रास पाहून कमलें प्रफुल्लित झालीं आहेत; आंब्यांवर मोहोर आला आहे; सुगंध वारा सुटला आहे, कोकिलपक्षी गायन करीत आहेत; वृक्षांस पालवी फुटली आहे; स्त्रिया आपल्या पतींस दूर न जाण्याविषयीं विनवीत आहेत; पक्व पर्णे गळून नवीं पानें त्यांच्या जागीं येत आहेत; या सर्व गोष्टींवरून असें भासतें कीं, शिशिरऋतूचा पराभव होऊन वसंताचा जय झाला आहे !" हें ऐकून, **सं**योगता आधींच कामानलानें विव्हल झाली होती, व त्याजमध्यें हें वसंतवर्णनरूप घृत पडल्यानें तो अग्नि विशेष चेतून तिचें भान व धैर्य अगदीं नाहींसें होऊन ती मोठ्यानें आपल्या सखीला ह्मणाली, 'माझी ही विरहव्यथा, त्या यज्ञमंडपांत जी सोन्याची प्रतिमा करून द्वारपालाचे जागीं बसविली आहे त्या प्रतिमेंत जीव आला ह्मणजे, त्याजकडून दूर होईल. एऱ्हवीं मला शांति मिळावयाची नाहीं व तूं येथें मोठमोठीं शृंगारिक वर्णनें करीत बसून आगींत तेल टाकूं नकोस.'

यावरून **सं**योगतेचा हेतु **पृ**थ्वीराजाला वरण्याचा आहे असें सखीनें जाणिलें, व तिणें तें सर्व वर्तमान तिच्या बापाचे (**ज**यचंदाचे) कानावर घातलें. तें ऐकून **ज**यचंदास फार वाईट वाटून त्यानें त्याबद्दल फार खेद दाखविला. तरी, तिच्या मनांत खरी गोष्ट काय आहे हें उघड उघड समजावून घेण्याकरितां राजानें पुनः त्या सखीला तिजकडे पाठविलें. तिनें तिला पुष्कळ बोध केला कीं, 'तूं जो **पृ**थ्वीराजाला वरण्याचा संकेत केला आहेस हा सर्वथा अयुक्त आहे. ज्या **पृ**थ्वीराजामुळें तुझा चुलता मारला गेला व पित्यानें आरंभिलेला यज्ञ विध्वंसित झाला त्या तुझ्या बापाच्या शत्रूला (**पृ**थ्वीराजाला) तूं वरीन ह्मणतेस हें योग्य नाहीं. तुझा पिता पराक्रमी असून तो आपल्या शत्रूचा केव्हां तरी सूड घेईल व त्यामुळें तुजवर संकट गुदरेल हें चांगलें नाहीं. तुझें भाग्य थोर कीं, **ज**यचंदासारखा तुजवर माया करणारा पिता तुला मिळाला असून त्यानें तुझ्या रूपगुणांला योग्य असा **क**हर **कं**ठीर हा उत्तम वर योजिला असतां, तूं असा दुराग्रह धरून

बसावेंस हें फार वाईट आहे.' त्यावर संयोगतेनें तिला निषेधपूर्वक खडसून असें उत्तर दिलें कीं, 'तुला इतकें बोलण्याचा अधिकार नाहीं व तूं या कामांत मुळींच बोलूं नयेस. मला वाटेल तें करण्यास मी मुखत्यार आहें. मुलांनीं वडिलांची आज्ञा पाळावी हें खरें. पण विवाहकार्यांत वरयोजनेची आवड ही वधूच्या आवडीनावडीवरच आहे. पृथ्वीराज जरी माझे बापाचा शत्रु असला तरी, तोच जर माझ्या मनाला पसंत वाटत असेल तर तुमचा सर्वांचा इतका आग्रह कां? तो पराक्रम, ऐश्वर्य, बल, तेज, रूप वगैरे सर्व गुणांनीं परिपूर्ण आहे, व एवढ्याकरितां मला त्याव्यतिरिक्त कोणासही वरावयाचें नाहीं. आतां, तूं ह्मणतेस कीं, तो पित्याचा शत्रु झाला आहे व त्या संबंधानें कदाचित् त्या उभयतांत कधीं तरी युद्धप्रसंग होऊन माझ्या पतीला धोका येण्याचा संभव आहे. तर तसें जरी झालें तरी त्यांत मला असंतोष नसून पित्यावरील माझी निष्ठा यत्किंचित्ही कमी व्हावयाची नाहीं. माझा पति जरी पित्याचे हातानें मृत झाला तरी त्याजवरोबर मी सती जाऊन 'साध्वी' ह्मणून जगांत कीर्ति ठेवून जाईन.' असें ह्मणून तिनें तेथेंच एक पद्य ह्मटलें. त्यांतील भावार्थः—"माझे वडिलांस माझें नमन सांगून असें कळीव कीं, मला पृथ्वीराज हाच एक वर योजून द्या."

हें सर्व वृत्त सखीनें पुनः जयचंदास कळवून सांगितलें कीं, तिच्या हट्टापुढें कोणाचें कांहीं चालावयाचें नाहीं. तर याचा काय बंदोबस्त करणें असेल तो करावा, नाहीं तर जगांत अपकीर्ति होईल!' हें ऐकून जयचंदानें कपाळावर हात मारून घेतला. तो पुष्कळ वेळ विचार करीत बसला; आणि ह्मणाला, "आपल्यामध्यें ज्यानें 'दुहिता भली न एक' अशी ह्मण केली आहे, ती सर्वथैव खरी आहे व ती ह्मण करणारा खरा अनुभविक होता!" नंतर त्यानें आपल्या या हट्टी कन्येस, गंगेच्या कांठीं एक महाल बांधून त्यांत कैद करून ठेविलें.

---

## प्रकरण सहावें.

प्रकरणप्रस्ताव.—पृथ्वीराजाचे कंठमणि.—कयमाषाचें वर्णन.—चामुंडराय व त्याजवरील संकट.—चामुंडरायाकडून मत्त हत्तीचा वध.—चामुंडरायाला कैद व त्याचा शस्त्रत्याग.—पृथ्वीराज कयमाष प्रधानाकडे राज्य सोंपवून मृगयेस जातो.—कयमाषाचा कारभार व त्याचें अविचारी कृत्य.—कयमाषाच्या अविचारी गुप्त कृत्याचा स्फोट.—त्याचा पृथ्वीराजाच्या हातानें वध.—कर्नाटकी वेश्या कनौजास जाते.—कयमाषाच्या मृत्यूचें देवीकडून चंदाला कथन.—कयमाषाच्या स्त्रीचें सहगमन.—पृथ्वीराजाचें शिकारीस जाणें व तेथें दुर्गा केदाराची भेट.—शहाबुद्दीन गोरीचा दुसऱ्यानें पराभव.—त्याशीं सल्ला.

उदय झाला ह्मणजे अस्त व्हावयाचा, आणि जन्मला तो मरावयाचा. हा ईश्वरी सिद्धांत आहे, त्याप्रमाणें या भरतखंडांत अनेक हिंदुराजमार्तंड आपल्या प्रखर तेजानें देदीप्यमान असे लोकांस भासत होते, व पुढें कालांतरानें त्यांसच अस्ताचलाची वाट धरावी लागून शेवटीं ते निजधामास गेले! तारुण्यावस्थेंतला जोम आणि पराक्रम कांहीं वेगळा असतो, तोच वृद्धावस्थेंत राहत नाहीं. एकच काल सर्वदा सर्वांस अनुकूल अथवा प्रतिकूल असतो असें नाहीं. ह्याचे अनेक दाखले मागील प्रकरणापर्यंत ठिकठिकाणीं दृष्टीस पडतात. आतां या प्रकरणांतही कांहीं विलक्षण इतिहास येणार आहे. त्यावरून, मनुष्याचे जे मित्र असतात ते प्रसंगविशेषीं शत्रु होतात व शत्रु असतात ते मित्र होतात, ह्याचीं उदाहरणें दृष्टीस पडतील.

पृथ्वीराजाचें मुख्य मंत्रिमंडळ ह्मणून जे सामंत होते त्यांतही त्याच्या परम प्रीतींतले असे पांच चार कंठमणि होते. ते:—मुख्य प्रधान कयमाष, पृथ्वीराजाचाच अंशभूत कवि चंद भाट, चुलता कन्ह चव्हाण, व शूर सामंत चामुंडराय वगैरे. यांपैकीं चामुंडराय, कन्ह चव्हाण व कवि चंद भाट यांचीं वर्णनें तर येथपर्यंत त्यांच्या अनेक कृत्यांवरून कळून आलींच आहेत. कयमाषाविषयीं चंद भाटानें असें लिहिलें आहे:—

"जिहि कयमाष सुमंत, खोदी खट्टुव धन कढ्यो ।
जिहि कयमाष सुमंत, राज चहुवानह चढ्यो ॥
जिहि कयमाष सुमंत, पारि परिहार मुरस्थल ।
जिहि कयमाष सुमंत, म्लेच्छ बध्यो बळ सब्बळ ॥
चहु ओर जोर चहुवान नृप, तुरक हिंदु डरपत डरह
वाराह वाघ वाराह बिच, सुवश सुवास जंगल धरह ॥"

ह्मणजेः—"कयमापानें खट्टुपूर येथील द्रव्याचा खजिना काढिला चव्हाणराजाला भरभराटीस आणिलें; मुरस्थल येथील पडिहारास मारिलें; गोरी म्लेच्छास कैद केलें; चोहोंकडे चव्हाणराजाचा दरारा बसविला; हिंदु व तुर्क या उभय बलिष्ठ लोकांस हटविलें; तो वाघासारखा भयानक असून त्यानें आपला कीर्तिसुगंध सर्व देशभर पसरिला."

चामुंडराय हा सामंत पृथ्वीराजाचा एक कंठमणि होता हें वर सांगितलें आहे. शिवाय तो पृथ्वीराजाचा श्यालक (मेहुणा—बायकोचा भाऊ) होता. परंतु त्याजविषयीं, चंद पुंडीर ह्मणून जो दुसरा एक सामंत होता त्याजमध्यें अदेखेपणा असून, तो नेहमीं त्याच्या चुगल्या सांगून पृथ्वीराजाचे कान भरीत असे. या चंद पुंडीरानें एक वेळ पृथ्वीराजाजवळ अशी एक बात झोंकून दिली कीं, चामुंडराय हा आपला भाचा कुमार रेणसी (पृथ्वीराजाची राणी दाहिमी ह्मणून चामुंडरायाची बहीण होती तिचा मुलगा) याजबरोबर जें एवढें सख्य ठेवीत आहे याचें कारण हें कीं, आपल्याबरोबर कांहीं कलह करून आपल्या गादीवर त्याला बसवावें, असा त्याचा हेतु आहे.' अशा प्रकारच्या नाहीं नाहीं त्या चहाड्या त्यानें राजाजवळ सांगाव्या. परंतु त्यांजकडे पृथ्वीराजानें लक्षच देऊं नये. असें होतां होतां एक वेळ असा बनाव बनून आला कीं, चामुंडराय कुमार रेणसी यास जंगलांत नेऊन शरसंधानविद्या शिकवून परत शहरांत येत असतां राजाचा शृंगारहारनामक आवडता हत्ती मदोन्मत्त होऊन त्यांचे अंगावर आला. हा हत्ती यापूर्वीं कित्येक वेळां हत्तिशाळेंत असाच उन्मत्त होऊन, सांखळदंड वगैरे तोडून शहरांतील हवेल्यांचा वगैरे नाश करीत व माणसें मारीत फिरत असे व त्या दिवशींही त्यानें असेच

कित्येक खून केले असून त्याजवर खून चढला होता. असला मत्त हत्ती अंगावर आल्यावर त्याजपासून रक्षण करणें ह्मणजे त्यांनीं जो पुढें उपाय केला तोच करणें प्राप्त होतें. हत्ती अंगावर आला तसा **चा**मुंडरायाचा घोडा न बिचकतां त्यानें हत्तीच्या दोन्ही दांतांवर पुढले पाय दिले. तों **चा**मुंडरायानें त्याचे सोंडेवर उजव्या हातें असा एक तरवारीचा वार केला कीं, त्याबरोबर हत्तीची सोंड दांतांसुद्धां खालीं उतरली; व डाव्या हातानें त्याच्या गंडस्थलावर असा एक गदाप्रहार केला कीं, त्यामुळें तो एवढा मत्त गज पण लागलाच तिरमिरी येऊन खालीं पडला. तें हत्तीचें धूड ज्या गल्लींत पडलें ती गवळआळी असून त्या हत्तीच्या धक्क्यानें गवळ्यांच्या दुकानांतलीं दह्यादुधांचीं मडक्कींगाडग्गीं सर्व ढांसळून फुटलीं व सर्व दहींदूध रस्त्यांत वाहून आलें. तो दह्यादुधांचा प्रवाह आणि त्या मत्त हत्तीच्या सोंडेंतून चाललेला रक्तस्राव या दोहोंनीं आणि त्या हत्तीच्या प्रेतरूप धुडानें ती गल्ली जणूं काय अगदीं भरून गेली.

**चा**मुंडरायाच्या हातानें हा हत्ती मारला गेला हें, राजाजवळ चुगल्या करणारांस विशेष साधन होऊन त्यांनीं भलभलत्या गोष्टी राजाचे मनांत भरविल्या; व राजानेंही त्या गोष्टी खऱ्या मानून व आपल्या प्रियकर **शृंगारहार** हत्तीस **चा**मुंडरायानें मारलें हा आपल्यावरच प्रत्यक्ष घाय केला असें समजून, **राम**गुरु **पु**रोहिताबरोबर बिड्या पाठवून **चा**मुंडरायास एकदम कैद करून आणण्याविषयीं हुकूम केला. तेव्हां राजसभेंतल्या बहुत लोकांनीं, असा हुकूम न करण्याविषयीं राजास विनंति करण्याचें मनांत आणिलें; परंतु त्यांच्यानें राजाच्या क्रुद्ध मुद्रेपुढें तद्विषयक चकारशब्द बोलवला नाहीं. **राम**गुरु **पु**रोहितानें **चा**मुंडरायाजवळ बिड्या घेऊन जाऊन राजाचा हुकूम त्यास कळविला. तेव्हां **चा**मुंडराय ह्मणाला, 'मला राजाचा हुकूम मान्य आहे. पण ह्या बिड्या घालून घ्यावयाच्या ह्मणजे हातांतील शस्त्र खालीं ठेवून घातल्या पाहिजेत. आणि मी एकदां हातांतील शस्त्र खालीं ठेवलें ह्मणजे मग पुनः तें घेणार नाहीं. ही गोष्ट राजास कबूल असेल तर बिड्या घालून घेण्यास मी तयार आहें.' **चा**मुंडरायाचें हें ह्मणणें **राम**गुरु **पु**रोहि-

तानें राजास जाऊन कळविलें, तेव्हां राजानेंही त्या वेळीं रागाच्या आवेशांत असल्यामुळें चामुंडरायाचें ह्मणणेंच कबूल करून त्याला निःशस्त्र केलें व त्याचे हातांत बिड्या घातल्या. या अन्यायकृत्यामुळें राजमंडळांत कांहीं तरी गडबड होईल असें पहिल्यानें लोकांस वाटलें होतें. परंतु सर्व सामंतमंडळी सामधर्मी होऊन सर्वत्र स्तब्धताच राहिली.

पृथ्वीराजानें हें कृत्य केलें खरें; परंतु त्याचें मन मागाहून त्यास खाऊं लागून कदाचित् लोक आपल्यावर कांहीं घोर प्रसंग आणतील अशी त्यास भीति वाटूं लागली; व तिकडे जयचंद शत्रु सूड उगविण्याकरितां केव्हां येईल याचाही नियम नव्हता. अशा दोन्ही काळज्यांनीं त्याचें मन अस्वस्थ झालें. तेव्हां चित्तास कांहीं शांति आणि करमणूक करावी ह्मणून त्यानें अरण्यांत जाऊन शिकार करण्यांत कांहीं दिवस घालविण्याचा निश्चय केला; व सर्व राज्यकारभार कयमाष प्रधानाकडे सोंपवून आपण शिकारीची तयारी करून अरण्यांत निघून गेला. तरी, कधीं कधीं राजा एकटाच रात्रीं शहरांत येऊन कमीज्यास्त काय चालतें तें बघत असे.

कयमाष हा राजनीतिविशारद असल्यामुळें त्यानें राजाचे पश्चात् सर्व कारभार उत्तम रीतीनें चालविला होता. परंतु भवितव्य कांहीं विचित्र असतें. या जगांत कनक आणि कांता यांजविषयींचा मोह कांहीं विलक्षण आहे. त्यापुढें कसलाही विचारी, विद्वान् आणि दूरद्रष्टा असला तरी प्रसंगीं त्याची बुद्धि चकते, व या पायीं या जगांत अनेकांवर अनेक अनर्थ ओढवले आहेत. त्यांतीलच कयमाष प्रधानाची गोष्ट झाली. एके दिवशीं आषाढमासांत कयमाष हा कांहीं दरबारी कामाकरितां कचेरीकडे जाण्यास निघाला असतां त्यानें जातांना एका महालाचे खिडकींत एक अतिसुंदर कर्नाटकी स्त्री उभी असलेली पाहून तो अगदीं कामविव्हल झाला. तिचें तें मोहक रूप आणि पाणीदार डोळे यांनीं तर तो जणूं काय शरविद्ध झाला. परंतु अंमळसा भानावर येऊन काम आटोपून घरीं आला आणि पलंगावर पडला. पुढें त्यानें त्या स्त्रीकडे तिच्या दासीबरोबर एक पत्र लिहून

पाठविलें. त्यांत तिची भेट व्हावी ह्मणून विनवणी केली होती. ही कर्नाटकी स्त्री पृथ्वीराजाच्या नाटकशाळांपैकीं एक होती. परंतु "कामातुराणां न भयं न लज्जा" असें ह्मणतात ती गोष्ट खोटी नव्हे. आपल्या राजानें ठेवलेल्या स्त्रीला आपण भेटण्याविषयीं विचारावें कसें? हें त्या हुशार ह्मणून गाजलेल्या कयमाष प्रधानास धोरण राहिलें नाहीं. कर्नाटकी ही तर जाणूनबुजूनच वेश्या. तिनें कयमाषाचा हेतु जाणून आपल्याकडे बोलाविलें व तो रात्रीं अंधार पडल्यावर गुप्तपणें तिच्या दासीबरोबर तिच्या महालांत गेला. तेथें तिनें अनेक प्रकारचें मद्यमांसाचें भोजन तयार करविलें होतें. त्याचप्रमाणें महालांत आरास व रोषनाई करवून जिकडेतिकडे गुलाबपाणी शिंपडलें होतें, व ठिकठिकाणीं अगरबत्त्या लाविल्या होत्या. त्याचा वास, शेजारींच पृथ्वीराजाची राणी इच्छनी कुमारी इचा महाल होता त्यांत जाऊन, तिनें कर्नाटकीचे महालांत गुप्तपणें आपली दासी पाठविली कीं, 'कर्नाटकीच्या घरीं आज एवढा थाट कशाचा आहे? राजा आला आहे कीं काय ?' दासीनें त्याप्रमाणें जाऊन खबर आणिली कीं, 'राजा कांहीं आला नाहीं; पण कयमाष प्रधान तेथें आला असून त्याजकरितांच तिनें एवढा जल्लोष केला आहे.' कर्मधर्मसंयोग पहा कसा तो ! त्याच दिवशीं रानांत शिकारीमध्यें असतां पृथ्वीराजास इच्छनी कुमारीच्या भेटीची इच्छा होऊन तो रात्रीं घोड्यावर बसून एकटाच शहरांत आला. तों इच्छनी कुमारीच्या महालाशीं येऊन त्यानें देवडीवरील एका खांबाशीं घोडा बांधिला आणि वर गेला. राणीच्या पलंगावर बसून इकडच्यातिकडच्या गोष्टी चालल्या असतां खिडकींतून त्याचें लक्ष कर्नाटकीच्या महालाकडे गेलें, व 'तेथें आज एवढा समारंभ कसचा आहे?' ह्मणून त्यानें राणीला विचारिलें. मग राणी आणि राजा अशीं दोघेंही खिडकीजवळ जाऊन बघूं लागलीं तों त्या महालांत चाललेला सर्व प्रकार त्यांच्या दृष्टीस पडला. त्यामुळें राजाचें मस्तक फिरून गेलें. परंतु शेवटीं त्यानें असा विचार केला कीं, 'कर्नाटकी ही हलक्या कुळांतील असून वेश्या आहे; तेव्हां त्याबद्दल विशेष कांहीं दुःख न वाटूं देतां, जो कांहीं

बंदोबस्त करणें तो उद्यां करूं.' परंतु इच्छनी कुमारीनें राजाचा हा विचार ऐकून त्यास असें उत्तर दिलें कीं, कयमाष प्रधान ह्मणजे आपल्या राज्याचा एक स्तंभ असून त्यानें राजस्त्रियांचा अभिलाष केला तरी कांहीं चिंता नाहीं. पण तो उत्तम प्रकरचा कारभार करितो व आपली कीर्ति वाढवितो ही गोष्ट आपण मनांत आणाल, तर याचप्रमाणें उद्यां तो आमच्यासारख्या आपल्या विवाहित स्त्रियांवर नजर ठेवील, तर तीही आपण कबूल कराल नव्हे का?' हें इच्छनी कुमारीचें भाषण त्याला वज्रासारखें लागलें. कयमाष आणि कर्नाटकी हीं दोघें पलंगावर बसून मोठ्या खुषींत आलीं होतीं व तीं एकमेकांस मद्याचे प्याले देत होतीं. असा प्रकार चालत असतांच एक बाण पृथ्वीराजानें मोठ्या त्वेषानें सोडिला; तो अचुक कयमाषाची छाती भेदून आरपार निघून गेला. तो लागल्याबरोबर कयमाषाला समजलें कीं, 'हा बाण पृथ्वीराजाचे हातचाच आहे'. नंतर त्यानें 'राम!' ह्मणून तसाच पलंगावर देह टाकिला. ह्याप्रमाणें कयमाषाचा अंत झाला, तेव्हां कर्नाटकीच्या पोटांत धडकी भरली कीं, 'आतां गति ठीक नाहीं.' नंतर ती तशीच तेथून बाहेर पडली ती थेट कनौजास गेली. तेथें तिनें राजकुमारी (जयचंदाची मुलगी) संयोगता इची प्रीति संपादून तिच्याजवळ तिची दासी ह्मणून राहिली. इकडे कयमाष त्या वेश्येच्या महालांत मरून पडला होता तेथेंच त्यास मूठमाती देऊन पुरून टाकिलें.

त्याच रात्रीं कवि चंद भाट यास त्याच्या उपास्य देवीनें दर्शन देऊन कर्नाटकीच्या महालांत घडलेली सर्व हकीकत त्यास कळविली. दुसरे दिवशीं तो राजदरबारांत जाण्याकरितां निघाला असतां त्यास वाटेंत कयमाषाची पत्नी भेटली. तिनें, कयमाष हा रात्रीं कर्नाटकीचे महालांत गेला असून तो पहांटे परत न आल्यामुळें कांहीं तरी अनर्थापात झाला असावा असा तर्क केला, व शोधाअंतीं तो तर्क खरा असें तिला समजलें. तिनें चंद वरदायीस भेटून त्याची अशी विनंति केली कीं, 'तुह्मी खरे देवीचे भक्त असून सतीचें सत्य पाळणारे असाल तर मी तुह्मांपासून एक वचन इच्छितें तेवढें द्या.' चंदानें

तिला, 'कसलें वचन?' ह्मणून विचारिलें. बाईनें सांगितलें कीं, 'असा असा माझ्या पतीचा घात झाला आहे. तर त्याचें तेवढें मस्तक मला कसेंही करून मिळवून द्या. ह्मणजे मी त्या मस्तकाबरोबर सती जाईन.' चंद 'बरें आहे' ह्मणून दरबारांत गेला. तेथें तो आपल्या जागेवर बसल्यावर, दरबारांत राजा हजर होताच; त्याणें सर्वांस प्रश्न केला कीं, 'प्रधान कोठें आहे?' परंतु सामंत मंडळीपैकीं कोणासच खरें वृत्त माहित नसल्यामुळें कोणीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. मग तोच प्रश्न चंदाकडे आला. तेव्हां चंदानें राजाजवळ एक वचन मागितलें व राजानें, तूं खरी हकीकत सांगशील तर वचन आहे असें ह्मटलें.' त्यावर चंदानें, त्याला जी जगदंबेच्या प्रसादानें रात्रीं घडलेली हकीकत समजली होती ती सर्व राजास सांगितली; व वचनाप्रमाणें कयमाषाचें मस्तक मागितलें. राजानें त्याप्रमाणें तें लागलेंच त्यास काढून दिलें व त्यानें तें कयमाषाच्या स्त्रीचे हवालीं केलें. नंतर तें मस्तक घेऊन त्याबरोबर ती साध्वी स्त्री सती गेली.

कयमाष हा राजशिक्षेला पात्र तर खरा होता, व त्याप्रमाणें तो राजाकडून शासनही पावला. परंतु त्याचे इतर राजकारस्थानी गुण फार चांगले असून शिवाय तो राजाचा मित्र होता. यामुळें त्यास झालें हें शासन फार झालें असें पृथ्वीराजास वाटून त्याचें मन उदास झालें. दुसऱ्या सामंतांनाही प्रधानाच्या अशा दुर्मरणामुळें बहुत दुःख झालें; परंतु राजा जेव्हां विशेष उदासीन व दुःखी पाहिला तेव्हां त्याचे समाधानाकरितां त्यांना आपलें दुःख विसरणें भाग पडलें; व त्यांणीं जेणेंकरून राजा खुष राहील ते उपाय आणि इलाज करीत जावे. त्या उपायांपैकीं राजाला मानवणारा मुख्य उपाय ह्मटला ह्मणजे शिकार हा एक होता व त्याप्रमाणें ते शिकारीचा बेत जमवून अरण्यामध्यें मृगयेला गेले. शिकारीमध्यें फिरतां फिरतां ही सर्व मंडळी पाणिपतावर गेली. तेथें ते आनंदांत कालक्रमण करीत असतां एके दिवशीं कोणी एक दुर्गा केदार नांवाचा भाट येऊन त्यानें चंद भाटाबरोबर कांहीं विद्यावाद करण्याची इच्छा प्रदर्शित केली. त्यावरून पृथ्वीराजाचे दरबारांत त्या दोघांचे सामने होऊन एकमेकांनीं एकमेकांस आपल्या

विद्येचे अनेक चमत्कार दाखविले. नंतर राजानें खुष होऊन दुर्गा केदाराची उत्तम रीतीनें संभावना केली.

ह्याप्रमाणें दुर्गा केदार संतुष्ट होऊन गिझनीस जाण्याकरितां निघाला. तों वाटेंत सोनपूर नांवाच्या गांवाजवळ त्यानें शहाबुद्दीनाची छावणी पडलेली पाहिली. तेव्हां तो बादशाहाकडे जाऊन त्याला आशीर्वाद वगैरे देऊन मोहबतखानाच्या तंबूंत उतरला. नंतर तो दरबारांत जाऊन बसतो आहे तों एक दूत, अंगास भस्म चोपडलें आहे, लांब जटा, अंगावर मृगचर्म, अशा वेषानें येऊन त्यानें बादशाहास बातमी दिली कीं, 'चामुंडरायाचे हातांत बिडी पडली, कयमाष तर स्वतः राजाचे हातानें मारला गेला, आणि पृथ्वीराज शिकारी आणि पारधी यांच्यामध्येंच गुंग झाला आहे. सारांश, जिकडे तिकडे अव्यवस्थाच आहे.' हा निरोप ऐकून दुर्गा केदारास कळलें कीं, 'हे मुनिवर्य दिसतात खरे, पण ते गुप्त हेर असून पृथ्वीराजाची अव्यवस्था टेहळीत फिरत असतात.' तेव्हां त्यानें लागलेंच आपल्या डेऱ्यांत येऊन गुप्तपणें एका सांडणीस्वाराबरोबर पृथ्वीराजास निरोप पाठविला कीं, 'तुह्मी असावध राहूं नका; मोहबतखान प्रधानाच्या मसलतीनें शहाबुद्दीन गोरी तुमच्यावर स्वारी करण्याची संधि बघत आहे.' हा निरोप ऐकतांच पृथ्वीराजानें सर्वांस सावध राहण्यास इषारा केला. त्याप्रमाणें त्याचे लोक जेथच्या तेथें आपली सावधगिरी करितात तों गोरीचें लष्कर निकट येऊन त्यांणीं बाण व तीर मारण्यास सुरुवात केली, व थोड्याच वेळानें उभयपक्षीयांकडून म्यानांतल्या तरवारी निघून कापाकापी चालली. ह्या संग्रामांत पृथ्वीराजाकडील सहाशें व शहाबुद्दीन गोरीकडचे सात हजार लोक पडले. ह्याप्रमाणें गोरीकडचा बहुत नाश झाला व शेवटीं त्यास तुवरानें पकडून राजाजवळ नेलें. पुढें राजानें त्यास कांहीं दिवस ठेवून घेऊन त्याजबरोबर सल्ला केला व त्याजपासून आठ हजार घोडे दंड ह्मणून घेऊन त्यास सोडून दिलें.

# प्रकरण सातवें.

कनौजावर जाण्याची तयारी.—कनौजदरबारांत चंद व पृथ्वीराज यांचें गमन.—चंदाकडून जयचंदाची स्तुति.—जयचंदाकडून चंद भाटाचा उपहास.—जयचंद व चंद यांचीं उत्तरें प्रत्युत्तरें.—जयचंद चंदाचा सत्कार करितो.—त्यांचें परस्पर संभाषण.—चंद भाट गोरीच्या पराभवाची हकीकत जयचंदास सांगतो व पृथ्वीराजाची तारीफ करितो.—पृथ्वीराजाला ओळखून काढण्याविषयीं जयचंदाचा प्रयत्न.—कर्नाटकीच्या चातुर्यानें संकटमुक्ति.—चंदाकडे नजरनजराणे आणि भेटी जातात.—पृथ्वीराजाचें गुप्तरूप कळतें.—पृथ्वीराज व चंद यांचीं भाषणें.—लंगडीरायाची जयचंदावर योजना.—लंगडीरायाचा अंत.—पृथ्वीराज व राजकन्या संयोगता यांची नजरानजर.—दासीबरोबर पृथ्वीराज संयोगतेच्या महालांत जातो:—पृथ्वीराज व संयोगता यांचा संवाद.—त्या उभयतांचा गांधर्वविधीनें विवाह.—पृथ्वीराज संयोगतेच्या महालांतून निघतो.—त्याची व पठाणाच्या टोळीची चकमक.—कन्ह व पृथ्वीराज यांचा संवाद.—संयोगतेला कनौजाहून दिल्लीस घेऊन जाण्याचा बेत.—संयोगतेचीही दिल्लीस जाण्याविषयीं संमति.—पृथ्वीराज व संयोगता यांचें दिल्लीस प्रयाण.—पृथ्वीराज जयचंदास निरोप पाठवितो.—जयचंदाचा रोष आणि पृथ्वीराजाचा पाठलाग.—आततताई व कहरकंठीर यांचा संग्रामांत अंत.—कहरकंठीर याची हकीकत.—आततताईचें पूर्ववृत्त.—पृथ्वीराजाच्या व जयचंदाच्या लोकांचें तुमुल युद्ध.—पृथ्वीराजाचा भाचा अल्हन व त्याचें चरित्र.—पृथ्वीराज मोठ्या कष्टानें दिल्लीस येतो.—जयचंद पृथ्वीराजाचें व संयोगतेचें लग्न लावितो.

कयमाषाच्या मृत्यूनें उदासलेल्या मनाचें सांत्वन करण्याकरितां ह्मणून पृथ्वीराज शिकारीस निघाला व त्यांत सुदैवानें शहाबुद्दीन गोरीवर त्यास जय मिळून त्याची कीर्ति वाढली. पुढें त्यास असें समजलें कीं, कनौजची राजकन्या संयोगता इणें आपल्यालाच वरण्याचा निश्चय केला आहे. तेव्हां तिचें हरण करण्याकरितां कनौजावर स्वारी करण्याचा त्यानें निश्चय केला. परंतु कनौजच्या राजाचें बल फार मोठें असून त्याजपुढें आपला टिकाव लागणार नाहीं असें त्यास वाटून, 'ह्याला काय उपाय करावा?' ह्मणून त्यानें आपल्या सर्व सा-

मंतमंडळीची सभा भरवून त्यांस प्रश्न केला. तेव्हां त्यांचीही निराशाच दिसली. तरी त्यांणीं राजास सांगितलें कीं, 'आपल्याला कांहीं जयचंदाची संपत्ति व ऐश्वर्य हरण करून आणण्याची इच्छा नाहीं. त्याच्या यज्ञास विघ्न आणावयाचें होतें. त्याप्रमाणें आणून यज्ञ बंद पाडिला. आतां त्याची कन्या हरण करावयाची तर श्रीकृष्णानें जसें रुक्मिणीहरणाचे वेळीं कपट केलें, तसें कपट करून तिचें हरण करावें ह्मणजे झालें. त्यांत घातपात, रक्तस्राव, किंवा मनुष्यहानि वगैरे कांहींएक नसून इच्छित हेतु पूर्ण होण्यास सुलभ मार्ग आहे.' नंतर असें ठरलें कीं, 'चंदानें बरोबर लष्कर घेऊन कनौजास जे अग्रूदार चारण आणि ब्राह्मण यज्ञसमारंभार्थ जमले आहेत त्यांच्या भेटीस जावें; त्याजबरोबर पृथ्वीराज व सामंत यांणीं गुप्तरूपें (वेषांतरानें) चंदाच्या तैनातींतलीं माणसें ह्मणून जावें, आणि कनौजास डेरा देऊन तेथें कांहीं दिवस मुक्काम करावा. मग पुढें जसें साधेल तसें करितां येईल.' याप्रमाणें ठरून चंदाबरोबर अकरा हजार फौज व वेषांतराचे नौकर अशी मंडळी दिल्लीहून निघाली. ते यमुना नदी उतरून पैलतीरास गेले तों त्यांस अनेक अपशकुन झाले. परंतु पृथ्वीराज हा "अर्थं साधयामि देहं वा पातयामि" असा किंवा "शेंडी तुटो किंवा पारंबी तुटो" अशा दृढनिश्चयाचा असल्यामुळें त्यानें ते अपशकुन वगैरे कांहींएक न जुमानतां सर्व मंडळी कनौजास दाखल झाली.

सर्व लष्कर शहराबाहेर उतरवून चंदकवि व त्याजबरोबर त्याचा पाण्याचा चंबु घेणारा सेवक ह्मणून पृथ्वीराज असे दोघे जयचंदाचे दरबारास जाण्याकरितां निघाले. दरबाराच्या दाराशीं गेल्यावर द्वारपालास, 'आंतमध्यें राजाला चंद भाट तुमच्या घरीं यज्ञ आहे ह्मणून आशीर्वाद देण्याकरितां आला आहे, असा निरोप घेऊन जा,' ह्मणून सांगितलें. व त्याप्रमाणें द्वारपालानें जयचंद राजाकडे निरोप पोंचविला. नंतर राजानें बहुसन्मानपुरःसर चंद भाटास दरबारांत बोलावून घेतलें. चंदानें दरबारांत गेल्याबरोबर राजास आशीर्वाद देऊन त्याच्या ऐश्वर्याचें वर्णन केलें:—

**"जहां आसनं सूर ठट्ठे सनाहं, जिने क्षत्रिवंशं किए एक राहं ।**
**जिने धर्रूनि दिक्पाल धर्धर्रू विखण्डं, धरे नृप्पछत्रं दुती कनूकदण्डं ॥**

जिने हेम पर्वत्तसे सब्ब ठाहे, जिने एक दिन् अट्ठ मुल्तान साहे ।
बरं जंपियो सब्ब जो चन्द चण्डं, सुते थप्पियो जाय तिहूत पण्डं ॥
जिने दच्छिनं देश अप्यो विचारे, तठे ऊतऱ्यो तुर्तबन्धं पहारे ।
जहां करूनडां हाल दुब्बानबेध्यो, जिने संधिचालूकके चार खेंध्यो ॥
जहां तीन दिन् जुद्ध भिर्भूमिडंडं, तहां तोरि तीलंग गोवालकुंडं।
जिने छंडिओ बन्धि इक्क गुन्डजीरा, त्रहे लीध वैरागरे अब्बहीरा ॥
जहां गज्जने सूर साहाब साही, तिने मोकल्यो सेव निसुरत भाई ।
जहां छोडि बीभीषणे जो मरोरे, तहां रोसके सोस दर्या हिलारे ॥
जिने बन्धिखुर्सान् किया मीर बन्दा, सुतो रावराठोर् बिजेपालनंदा।
इते बंश छत्रीश आवे हकारे, तहां ईक चव्हान् पृथूराज ठारे ॥"

भावार्थः—"ज्याचे सिंहासनाभोंवते शूर पुरुष बसले आहेत; सर्व क्षत्रियवंश ज्यानें एक मार्गावर आणिले; ज्यानें पृथ्वी व दिक्पाल यांचें दर्शन केलें; मोठमोठे राजे ज्यास सुवर्णकरभार देतात; ज्याच्या ताब्यांत सुवर्णपर्वत आहेत; ज्यानें एका दिवसांत आठ सुलतान धरिले; तिहूता (तिबेटा) पर्यंत ज्यानें आपला ताबा बसविला, ज्यानें विंध्याचळाच्या खालींही दक्षिणदेश जिंकिला; चालुक्यराजास शासन केलें; कानडाप्रांत जिंकिला; तैलंगण व गोवळकोंडें घेतलें; हिऱ्याच्या खाणी ताब्यांत घेतल्या; गजपति शहाबुद्दीन याचे तर्फे त्याचा भाऊ निसुरतखान आला होता त्यास पकडलें; समुद्रपार जरी लंकाद्वीप आहे तरी तेथील बिभीषणराजाचा अंमल काढला; आणि ज्यानें मीर खुरासानास कैद केलें; असा जो तूं विजयपाळ राजाचा पुत्र जयचंद त्या तुझ्या पाचारणानें छत्तीसही कुळांतले राजे तुझ्याजवळ संमेलित झाले !—परंतु त्यांत पृथ्वीराज चव्हाण मात्र आला नाहीं."

वरील सहा श्लोकांच्या तेवीस चरणांपर्यंत चंदानें जयचंदाचें करावें तसें वर्णन केलें व तें करीत असतां तेवीस चरणपर्यंत जयचंदराजास मोठा संतोष वाटून चंदकवीची उत्कृष्ट संभावना करून देण्याची त्याला परम इच्छा झाली होती. परंतु शेवटचा चोविसावा चरण ह्मणून त्याच्या सर्व ऐश्वर्याची जी चंदानें व्यर्थता दाखविली, तेणेंकरून तो फार खजिल होऊन त्याला क्रोध आला. आणि तो मोठ्या संतापानें बो-

लला कीं 'विधात्यानें तुह्मां भाटांस जें वंशपरंपरा दारिद्र्यग्रस्त राखिलें आहे तें दारिद्र्य तुमच्या या अशा गुणांवरून कोण आणि केव्हां दूर करूं शकणार आहे?' यावर राजा त्यास आणखी जें कवितेंत ह्मणाला त्याचा भावार्थ असा कीं, 'घोडे, हत्ती, सुवर्ण व रत्नें यांचा पाऊस राजा पाडूं शकेल; परंतु भिकाऱ्याचे डोकीवर अवदशेचें छत्र असल्यामुळें त्या पावसाचा एक थेंब तरी त्याचे अंगावर कोठून येईल? हंसाला मौक्तिकें मिळालीं नाहींत, सिंहाला मत्तकरींद्रगंडस्थल विदारण्यास सांपडलें नाहीं, आणि तरुण स्त्रीपुरुषांस एकमेकांचें अदर्शन झालें, ह्मणजे तीं सर्व दुर्बळ व निरुत्साह होतात, व तें योग्यच आहे; परंतु, बरदाई[1] (चंदा), आषाढ महिन्यांतल्या शिळंधारीच्या पर्जन्यवृष्टीमध्यें कोणीं तुझ्या खांद्यावर नांगर देऊन तुझ्याकडून जमिनीची नांगरणी पेरणी कांहीं केली नाहीं. मग तूं इतका दुबळा होऊन याचना करण्यास काय ह्मणून आलास? हें नवल आहे!'

यावर चंदानेंही समर्पक उत्तर दिलें. त्याचा भावार्थ हा कीं, 'दिल्लीच्या राजानें (पृथ्वीराजानें) बहुत राजांस पादाहत केल्यामुळें त्यांनीं दांतीं तृण धरिलें. ह्याप्रमाणें तृण धरितां धरितां सर्व दिल्ली प्रांतांतल्या जंगलांतील गवत नाहींसें झालें, व ज्या अर्थी तूं मला 'बळदिया' (बैल) असें ह्मटलेंस, त्या अर्थी बैलांस गवत खावयास पाहिजे त्याचा तर दुष्काळ झाला, त्यामुळें मी रोडावलों!'

हें उत्तर ऐकून जयचंद चंदाला ह्मणाला, 'पण, हे बळदिया (बरदाई), तुला अजून कोणीं बडविलें नाहीं, कोणीं तुझ्या पाठीवर गोणी लादली नाहीं, तुला कोणी गोवारी मिळाला नाहीं, तुझ्या नाकांत कोणीं वेसण अडकविली नाहीं, तुला विहिरीवर कोणीं मोटेला जुंपलें नाहीं, लढाईंतही गाडे ओढण्यास तुला कोणीं लाविलें नाहीं,

---

१. बरदी किंवा बरदाई, हें चंदकवीचें उपनांव असून 'बरदी' याचा श्लेष काढून 'बळदिया' ह्मणजे 'बैल' असें जयचंदानें चंदाला ह्मटलें. आणि ज्या अर्थी बैल ह्मटलें त्या अर्थी त्यास नांगरास जुंपलें पाहिजे. तसें कांहीं नसतां तूं एवढा बुभुक्षित होऊन रोडावलास कां? असें जयचंद चंदाला लावून बोलला!

जनरथाला जुंपूनही सारथ्यानें तुझी शेंपटी मुरगाळली नाहीं, अथवा भरपावसाळ्यांतील चिखलट जमिनीची नांगरणी करण्यास तुझ्या खांद्यावर कोणीं नांगरही लादला नाहीं. तेव्हां तुला असें दुर्बल होण्याचें प्रयोजन काय?'

यावर पुनः चंदानें उत्तर केलें, जयचंदा, ऐक. मला बडविणें, पाठीवर गोणी लादणें, मला गुराखी मिळणें, व तशीच नाकांत वेसण अडकविणें ह्या गोष्टी मला कशा सहन होतील? विहिरीवरील मोटेला तरी मी काय ह्मणून जुंपला जाऊं? एकावरच इतकीं कामें लादूं लागल्यास त्याच्यानें काय होणार आहे? परंतु हत्तीघोड्यांच्या गर्दींत यजमानाबरोबर कित्येक शत्रूंचा पाडाव केला व पृथ्वीराजाच्या पराक्रमवर्षावाच्या शिळंधारेखालीं दुस्मानांच्या हृदयरूप शेतावर नांगर फिरविण्याचें मात्र काम मीं केलें; आणि त्यांनीं तर बिचाऱ्यांनीं दांतीं तृण धरून धरून सर्व गवत खलास करून टाकिलें. तेव्हां ह्या नांगर फिरविण्याच्या श्रमानें आणि तृणदौर्भिक्ष्यानें मी (बरदीया–बळदीया–बैल) बुभुक्षित आणि दुबळा झालों! प्रथम नागोर येथें शहाबुद्दीन गोरीच्या मुसक्या बांधिल्या, त्या वेळीं त्यानें कांहीं तृण खाल्लें; गुजराथचा राजा भोळा भीमदेव याचा पराभव झाल्यावर त्यानें दांतीं तृण धरून धरून कांहीं कुरणांचा फन्ना उडविला; मोगल लोकांचा पाडाव करून त्यांस अंकित केल्यामुळें त्यांनींही राहिलेलें गवत खाल्लें, व हें सर्व गवत मूळासुद्धांच खाऊन टाकिल्यामुळें त्यास पुनः नवीन पालवी फुटली नाहीं. ह्याप्रमाणें सामंतनाथ (पृथ्वीराज) यानें युद्धांत बहुत शत्रूंची मानखंडना करून त्यांजकडून दांतीं तृण धरविलें, व यामुळें गवताचा दुष्काळ पडून मी दुर्बळ झालों!'

ह्याप्रमाणें चंदकवीची निर्भीडता, कल्पकता, आणि हजरजबाबीपणा पाहून, जयचंद जरी मनांत रुष्ट झाला होता तरी चंदाचे हे गुण पाहून तो फार खुष झाला. नंतर त्याणें त्याचा मोठा आदरसत्कार करून त्याला अनेक प्रकारचीं उपायनें दिलीं. पुढें बोलतां बोलतां तो त्याला ह्मणाला, 'चंदा, तुझ्यासारखे बुद्धिमान् व चतुर असे दूरदृष्टि मसलतगार पृथ्वीराजाजवळ असतां त्यानें आह्मांशीं वैर कां धरिलें आहे? माझा पिता

आणि पृथ्वीराजाचा बाप अनंगपाळ (वस्तुतः आजा–मातामह) यांचा परस्पर किती स्नेह असून त्यांना एकमेकांविषयीं किती अभिमान असे, हें, कांहीं तुह्मां कोणास माहित नाहीं असें नाहीं. सोमेश्वराचे लग्नाच्या वेळेस अनंगपाळाला आह्मीं किती द्रव्यसाह्य केलें; व अनंगपाळानें पृथ्वीराजाला दत्तक घेतलें तेव्हां जर तसें करण्यास आह्मीं हरकत घेतली असती तर ती सहज अमलांत आली असती. परंतु अनंग-पाळ हा आमचा मांडलीक असून स्वराजनिष्ठ आणि स्नेही ह्मणून आह्मीं त्यास तसल्या प्रकारची कांहींही हरकत आणिली नाहीं. ह्या सर्व गोष्टी तुह्मां दिल्लीवाल्यांस माहित असतां व सर्व हिंदु मुसलमान माझे आज्ञांकित असून, त्याप्रमाणें त्यांस मीं पाचारण करून हा रा-जसूययज्ञ सुरू केला असतां, तुह्मीं त्या प्रसंगीं माझ्या पाचारणास मान तर दिलाच नाहींच; परंतु उलट माझ्या भावास मारून यज्ञास विघ्न मात्र आणिलें. यावरून मी असें खचित समजतों कीं, हिंदुध-र्माचा ऱ्हासकाल समीप आला असून त्याप्रमाणें अधर्मप्रवृत्तीस तुह्मीच मूळ कारण झालां. तर ह्याजबद्दल तुह्मांला कांहींच वाटूं नये काय?'

चंद भाट ह्मणाला, 'आह्मीं केलें ही अधर्मप्रवृत्ति होय हा जो आपला समज आहे ही केवळ चूक असून आह्मीं जें केलें तें धर्म-न्यायानें अगदीं बरोबर केलें. आपला आणि अनंगपाळराजाचा जसा परिचय आणि स्नेह होता तशीच पृथ्वीराजही आपल्याविषयीं पूज्य-बुद्धि बाळगितात व होईल तितकी आपली सेवा करणें त्यांस अभिमत आहे. याविषयीं सत्यता दाखविण्याचें कारण नाहींच. कनौजावर जेव्हां शहाबुद्दीन गोरी चालून आला तेव्हां पृथ्वीराजानें साह्य केलें नसतें तर आपलें राज्य कनौजास राहतें, किंवा आपण दक्षिणेकडे दिग्विजय करण्यास गेलां होतां तिकडेच आपल्याला राहावें लागतें, याविषयीं आपणच विचार करावा. आमची तर खात्री आहे कीं, आपला पराजय होऊन कनौजचें आधिपत्य शहाबुद्दीनाकडेच गेलें असतें. तेव्हां पृथ्वीराजानें ही जी आपली सेवाचाकरी केली ही आ-पण जाणतां काय? परंतु, आपण कलियुगांत वर्ज्य जो यज्ञ तो कर-ण्यास प्रारंभ केला हें कांहीं पृथ्वीराजास बरोबर वाटलें नाहीं. कारण

"अश्वमेधो गवालंभं संन्यासः पलपैत्रिकम् ।
देवरेण सुतोत्पत्तिः कलौ पंच विवर्जयेत् ॥"

ह्मणजे—"अश्वमेध, गोवध, संन्यास, मांसश्राद्ध आणि दीराकडून पुत्रोत्पत्ति हीं पांच कलियुगांत वर्ज्य आहेत." अशी धर्मशास्त्राची आज्ञा असतां ती तुह्मीं न मानतां यज्ञारंभ केला हें पृथ्वीराजास न आवडून त्याला ह्या प्रसंगानें आपल्यास हरकत करावी लागली.'

नंतर जयचंदानें चंदाला विचारिलें कीं, 'शहाबुद्दीन गोरीची कनौजावर जेव्हां स्वारी आली तेव्हां मी तर दक्षिणेकडे दिग्विजयास गेलों होतों; त्यामुळें इकडे काय काय हकीकत झाली व पृथ्वीराजानें मजकरितां काय काय परिश्रम केले तें मला मुळींच माहित नाहीं. तर तो सर्व बनाव कसकसा घडून आला हें मला तूं सविस्तर सांग.'

त्यावर चंदानें ती सर्व हकीकत सांगण्यास प्रारंभ केला. तो ह्मणाला—'कितीएक दिवसांपासून गोरीची नजर हिंदुस्थानावर होती हें माहित आहेच. त्यानें कितीएक वेळ पृथ्वीराजावर स्वाऱ्या करून त्यास त्रास दिला होता; परंतु तितक्याही वेळ पृथ्वीराजाकडून त्याचा पराभव झाला. अद्यापिही त्याचे हेर नगरांत फिरत आहेत ! आपली स्वारी दक्षिणेकडे दिग्विजयास गेली आहे अशी खबर त्यास लागतांच तो कनौज घेण्याचे हेतूनें मोठी तयारी करून आला. तों रस्त्यांतच कुंडिनपुरचा राजा रायसिंग वाघेल हा त्यास झप्‌दिशीं आडवा होऊन त्यांची झटापट झाली. पण त्या चकमकींत वाघेल हा मारला जाऊन तुर्क लोकांचाच जय झाला. त्यामुळें तर त्याला अधिकच स्फुरण येऊन त्यानें पुढें नयरपूर लुटिलें. ह्या वेळीं पृथ्वीराज नागोर येथें आणि कयमाष खट्टपूर येथें होता. त्यांस गोरीचा इकडील दांडगावा कळल्यावर त्यांना असें वाटलें कीं, आपण (जयचंद) घरीं नसून यवनांनीं एकदां कनौज घेतलें ह्मणजे हिंदूंचें तेज व ऐश्वर्य कमी झालेंच समजावें. ह्मणून ते दोघे एकत्र होऊन गोरीवर चालून आले. त्यांत त्यांनीं गोरीचा सर्वांशांनीं पराभव करून त्याचे सर्व हेतु व्यर्थ केले. या लढाईंत गोरीकडील आठ हजार पठाण पडले व शहाबुद्दीन

अन्नपाण्यावांचून एकटाच पळून जात असतां त्याला चंद पुंडीर यानें पकडिलें; व त्याजपासून आठ हजार घोडे खंडणी घेऊन त्याला सोडून दिलें.'

जयचंदानें ही हकीगत ऐकून ह्मटलें कीं, 'एकूण पृथ्वीराजाची तूं तर बरीच तारीफ केलीस. परंतु माझ्या या कचेरींत हे जे मुकुट धारण करून राजे बसले आहेत त्यांत पृथ्वीराजासारखा कोणी सांपडेल किंवा नाहीं?'

तेव्हां चंद उंच हात करून, मागें पृथ्वीराज वेषांतरानें त्याचा सेवक ह्मणून उभा असतां त्याजकडे खालीं वर हात करून ह्मणाला, 'बत्तीस लक्षणांनीं युक्त, छत्तीस वर्षें आणि सहा महिने इतकें ज्याचें वय आहे, दुर्जनांचा शास्ता, ज्याला शत्रु खंडणी देऊन मुक्त होतात, कोणी शरण येऊन ज्याची पादसेवा करितात, अशा प्रकारचा सर्वगुणमंडित व ज्याला सर्व हिंदु लोक पूज्य मानितात, असा चतुर चव्हाणकुलोत्पन्न जो पृथ्वीराज तो आहे!' असें ह्मणून त्यानें मागें उभा राहिलेल्या सेवकवेषी पृथ्वीराजाकडे हात केला. इतकेंच नव्हे, तर आणखी वारंवार त्याजकडे हात करून ह्मणाला, पृथ्वीराज हा गोकुळांत श्रीकृष्ण किंवा पांडवांत भीम अथवा रावणासारखा अभिमानी आणि रामचंद्रासारखा पराक्रमी आहे!'

चंदानें जयचंदाला फसविण्याकरितां पृथ्वीराजास सेवकवेष देऊन आपल्या बरोबर नेलें होतें. परंतु त्याच्या बोलण्याच्या व हातांच्या झोंकावरून जयचंदाला संशय उत्पन्न झाला. तो मोठा चाणाक्ष असल्यामुळें त्याला वाटलें कीं, चंदाचे मागें जो पाण्याचा चंबू घेऊन उभा आहे तो वास्तविक सेवक नसून वेषधारी सेवक आहे. असें मनांत आणून त्यानें त्या चंबूवाल्याकडे बघितलें; तों त्याच्या डोळ्यांचें तेज पाहून जयचंद समजलाच. त्या वेळीं जसे दोन सिंह एका ठिकाणीं भेटावे आणि त्यांस स्फुरण यावें त्याप्रमाणें त्या सभेंत त्या दोघांची स्थिति झाली. जयचंदानें तर असेंही मनांत आणिलें कीं, या सेवकाला एकदम कैद करावा. परंतु पुनः त्यानें असा विचार केला कीं, मला हा पृथ्वीराज आहे असें वाटतें आणि तो नसून खराच

सेवक आहे असें ठरलें, ह्मणजे जगांत आपलें हंसें आणि दुष्कीर्ति मात्र होईल कीं, जयचंदाच्यानें पृथ्वीराजास ओळखवलें नाहीं. तेव्हां आतां या सेवकाला ओळखण्याची काय युक्ति करावी?' असा विचार करीत असतां त्याला अशी कल्पना सुचली कीं, 'पृथ्वीराजाला पूर्णपणें ओळखणारी आपले जवळ कर्नाटकी दासी, जी पूर्वी पृथ्वीराजाचे आश्रयाला होती, ती आहे. तिजकडून याची परीक्षा पहावी. कारण, तिला सर्व जगांतील पुरुष ह्मणजे केवळ स्त्रियांप्रमाणें वाटतात. परंतु पुरुष काय तो एक पृथ्वीराजच आहे व त्यालाच लाजून ती डोक्यावर पदर घेते, अशी तिची ख्याती आहे.' ह्याप्रमाणें विचार करून त्यानें कर्नाटकी दासीला सभेंत बोलावून आणिलें. तिनें सभेंत आल्यावर दुरूनच पृथ्वीराजाला पाहिलें आणि पट्कन् डोक्यावर पदर घेतला. हें चंदानें पाहिल्याबरोबर कर्नाटकी दासीला त्यानें नेत्रसंकेतानें सुचविलें कीं, 'आह्मी येथें कांहीं कपटानें आलों आहोंत. हा कपटस्फोट झाला तर आमच्या जीवावरच बेतेल.' शिवाय त्यानें त्यांत असेंही सुचविलें कीं, 'तुझ्यामुळें कयमाषप्रधानाची तशी अवस्था झाली, तीच तूं येथेंही आमच्या प्राणांवर संकट आणण्यास कारण होतेस हें बरोबर नाहीं.' चंदाचा नेत्रसंकेत, कर्नाटकी चाणाक्ष असल्यामुळें तिनें ताबडतोब ओळखून डोकीवर घेतलेला पदर पुनः काढून टाकिला. त्यावरून जयचंदाला संशय उत्पन्न झाला कीं, 'हें आहे काय? इनें पहिल्यानें पदर सरसावून घेतला कां? आणि आतां पुनः काढिला कां? यावरून काय समजावें?' तेव्हां त्यानें याबद्दलची खात्री करून घेण्याकरितां तिला पुसिलें कीं, 'तूं पहिल्यानें डोकीवर पदर घेतलास कां? आणि मागाहून काढून टाकलास कां? तूं तर पृथ्वीराजाचे समोर मात्र पदर घेतेस असा तुझा नियम आहे. मग तुला पहिल्यानें सभेंत आल्याबरोबर येथें पृथ्वीराज असलेला दिसला काय?' राजाचा हा प्रश्न ऐकिल्याबरोबर कर्नाटकीनें न घाबरतां स्त्रीचरित्राचें कौशल्य लढवून राजाचें समाधान केलें. ती ह्मणाली, 'आपण ह्मणालां ती गोष्ट खरी. मी पृथ्वीराजाशिवाय दुसरे कोणाचे समोर पदर घेत नाहीं. परंतु पृथ्वीराज आणि चंद हे दोघेही

एकांशभूत, मित्र आणि एकजीवाचे असल्यामुळें पृथ्वीराजाला जो मान मी देतें तसाच चंदालाही अंशतः द्यावा असें मला वाटून, पहिल्यानें मीं पदर घेतला आणि मग काढून टाकिला !'

कर्नाटकीच्या तोंडांतून हें उत्तर निघेपर्यंत त्या सभेंत नवरसही वास करीत होते असें चंदानें आपल्या 'रास्यां'त वर्णन केलें आहे:—

**'भय अद्भुत कमधज्ज, हास्य चहुवान उपन्नो ।**
**करुना दिसी संभरीय, चंद वर रुद्र निपन्नो ॥**
**बीभत्स कायर मनह, वीर भट सुभट विराजे ।**
**गोख बाल तहां जंखि, द्रिग्ग शृंगार सुसाजे ॥**
**उपजि भयानक दिखि अरि, लोह लहर बज्जन दुसरा ।**
**मंगाइ पान पहु पंगने, दीन चंद मन शांति कर ॥'**

ह्मणजे—'पृथ्वीराज सेवकवेषानें आला हा जयचंदास अद्भुतरस; कर्नाटकीचें स्त्रीचातुर्य बघून पृथ्वीराज वगैरेंस हास्यरस; कित्येक सभासदांस असें वाटलें कीं, येवढा पृथ्वीराज वीरशिरोमणि, पण येथें पराक्रमहीन असा राजाचे हातांत सांपडणार ह्मणून करुणारस; चंदानें तामसीवृत्तीचें जयचंदास सडेतोड उत्तर दिलें हा रुद्ररस; जयचंदानें चंदास दिलेलीं विशेषणें हा बीभत्सरस; शूरांचे दंड स्फुरण पावूं लागले हा वीररस; पडद्याच्या आड राजकन्या संयोगता शृंगारयुक्त चेष्टांनीं हा सर्व देखावा बघत होती तो शृंगाररस; कित्येकांना आतां काय प्रसंग येईल कोण जाणे अशी भीति वाटली तो भयानकरस; आणि शेवटीं राजानें वेत्रवतीकडून पानपट्टी खाल्ल्यावर चंदानें राजाची आज्ञा घेऊन चंबुवाल्या सेवकासह सभेंतून निर्वेधपणें प्रयाण केल्यामुळें सर्वांस वाटलेली शांति हा शांतिरस.'

अस्तु. कर्नाटकीचें वरील उत्तर ऐकून त्याच वेळीं जें पृथ्वीराजावर संकट येणार होतें तें टळलें. जयचंदानें इतकी चिकित्सा जेव्हां चालविली तेव्हां पृथ्वीराजाला आपल्या जीवाची बिलकुल आशा नव्हती. त्याला वाटलें कीं, 'आतां आपलें सर्व कपट बाहेर पडून आपलीं शंभर वर्षें आजच भरलीं.' परंतु हें भीतिरूप अभ्र कर्नाटकीच्या चातुर्यानें तेव्हांच वितळून सर्वत्र स्वच्छ झालें. ह्याप्रमाणें ह्या वेळीं चंद व त्याचा सेवकवेषधारी पृथ्वीराज यांचा बचाव झाला. चंदाला रा-

जानें निरोप देऊन त्याचे सरबराईस सोजतचा राजा रावण, ज्याचे कडे जयचंदानें यज्ञसमारंभांत कोतवाली दिली होती, त्याला देऊन सांगितलें कीं, 'शहराच्या पश्चिमदिशेकडे मखमाली तंबू ठोकिला आहे त्यांत यांस नेऊन उतरवा व तेथेंच यांच्या रिसाल्याचीही व्यवस्था लावा.' त्याप्रमाणें रावणानें त्यांची सर्व व्यवस्था लाविली व चंदाचे तंबूभोंवतीं खडा पाहरा ठेवून 'ओळखीवांचून आंतमध्यें कोणास सोडूं नका' ह्मणून ताकीद दिली.

ह्याप्रमाणें चंदाचा मुक्काम व्यवस्थेनें झाला. त्याजकडे जयचंदानें आपला सुमति प्रधान व श्रीकंठ पुरोहित यांजबरोबर भेट व नजराणे पाठविले. त्यांचा चंदानें स्वीकार करून भेटीच्या व नजराण्यांच्या ताटांत शिष्टाचाराप्रमाणें दोन दोन मोहरा टाकून ताटें परत पाठविलीं, व प्रधान आणि पुरोहित यांस पानसुपारी देऊन चंदानें त्यांस निरोप दिला. ते चंदाचे तंबूंतून निघून जातात तों थोडेच वेळानें, जणूं काय कामदेवाचें लष्करच, अशी एक तरुण स्त्रियांची टोळी तंबूकडे येत आहे असें चंदानें बघितलें. त्या सर्व षोडशवार्षिकी एकसारख्या पोषाखाच्या व शृंगारलेल्या अशा कुलीन स्त्रिया होत्या. अशा त्या वस्त्राभरणांनीं युक्त सुंदर स्त्रिया, हातांत सोन्याचीं ताटें असून त्यांवर किनखापी सरपोस अशा थाटानें, त्या चंद भाटाच्या तंबूचे अंगणांत प्रवेश करित्या झाल्या. त्या ताटांत मेवामिठाई व फळफळावळ वगैरे सामान भरलेलें असून तें नजर करण्यास आणिलें होतें. त्याचप्रमाणें कांहीं ताटांत उंची पोषाखही झांकून आणिले होते. हा सर्व स्त्रीसमाज चंदाचे गोटांत आल्यावर त्यांस बघून चंदाचे रिसाल्यांतील लोक तर अगदीं मोहित होऊन गेले. त्यांतील एकानें त्यांस, 'तुह्मी कोण? व कोठून आणि कशाकरितां आलां?' असें विचारिलें. तेव्हां त्यांणीं सांगितलें कीं, 'आह्मी जयचंद महाराजांची, सिंहलद्वीपाहून करून आणिलेली जुन्हाई पद्मिनी राणी, इची कन्या संयोगता, तिच्या दासी आहोंत. राणीसाहेबांकडून हा नजराणा घेऊन आलों आहोंत. चंदाची भेट घ्यावयाची आहे, तर त्यांची परवानगी आणा.' त्याप्रमाणें त्यांस चंदानें आंत येण्यास सांगितलें. त्यांणीं आंत जाऊन, मुख्य दासीनें

राणीचा आशीर्वाद व निरोप चंदास कळविला व आणिलेली भेट त्याजपुढें ठेविली. चंदानें त्याही भेटीचा स्वीकार करून ताटांत पांच पांच मोहरा टाकून दासींस निरोप दिला व त्यांजबरोबर राणीसाहेबांच्या सुशीलपणाची आणि विचारदृष्टीची तारीफ करून त्यांना क्षेमकुशलाचा निरोप पाठविला.

चंदाच्या सरबराईस जे लोक ठेविले होते त्यांस जयचंदानें असें सांगितलें होतें कीं, चंदाबरोबर पृथ्वीराज खास आहे; परंतु त्याबद्दल गुप्त तपास ठेविला पाहिजे. एकांतीं पृथ्वीराज हा मुख्यस्थानीं व चंद त्याचा आश्रित असा बसलेला आढळल्याशिवाय ह्याबद्दलची खात्री होणार नाहीं. तर ह्याबद्दल बारीक तपास ठेवा.' त्याप्रमाणें ते लोक तपासांत होते. परंतु उघडपणें जेव्हां चंद तंबूमध्यें बसे तेव्हां यजमानाप्रमाणें त्याजकडेस मुख्यस्थान असून दरबारांत आलेला चंबूवाला त्याचेजवळ उभा राही असें ते पाहात. एके दिवशीं जयचंदाच्या एका सेवकानें एकांतीं चंद असतां असें पाहिलें कीं, चंबूवाला मनुष्य मुख्यस्थानीं बसून चंद त्याच्या आश्रितासारखा जवळ बसला आहे, व हें त्यानें ताबडतोब जयचंदास सांगितल्यावर जयचंदाची खात्रीच झाली. तरी त्यानें स्वतः एक वेळ गुप्तपणें जाऊन बघून यावें असा विचार करून तशी संधि एकदां साधिली व गुप्त हेरानें दिलेली बातमी खरी होती असें तो समजला. नंतर त्यानें पृथ्वीराजाला पकडण्याचा पक्का निश्चय केला.

एके दिवशीं चंद व पृथ्वीराज गोष्टी बोलत बसले असतां चंदाला पृथ्वीराज ह्मणाला कीं, जयचंदाचें सामर्थ्य काय आहे तें सर्व समजलें. तेव्हां त्याविषयीं जितकी आपण भीति बाळगतों तितकी बाळगण्याचें कारण नाहीं.' त्यावर चंद विनोदानें ह्मणाला, 'भीति बाळगण्याचें कारण आहे कीं नाहीं हें मीं काय सांगावें? मजबरोबर वेषांतर करून पाण्याचा चंबू घेऊन जावें लागतें यावरूनच भीतीचें कारण आहे कीं नाहीं हें समजेल!' राजा ह्मणाला, 'ती गोष्ट खरी. पण आतां मला पक्का अनुभव आला आहे कीं, असा गुप्त व्यवहार ठेवण्याचें कांहीं कारण नाहीं. उद्यां मी माझा राजवेष धारण करून

प्रकट होतों. मग बघून घेईन काय होतें तें. पण मग तुझी मात्र छाती धडधड करूं लागेल!' हा दोघांचा विनोद ऐकून कन्ह चव्हाण ह्मणाला, 'पृथ्वीराज, हें तूं काय मांडिलें आहेस? चंदा, तूं काय त्याची थट्टा करितोस? तूं भाटभाई आशीर्वाद करून सुटून जाशील; पण शूरांना आपल्या माना पुढें केल्या पाहिजेत हें कोठें तुला ठाऊक आहे?'

अशीं भाषणें चाललीं आहेत तों नगारेनौबदींचा आवाज, घोड्यांचें खिंकाळणें व टापांचा खडखडाट, शूरांच्या आरोळ्या, हाका, आणि 'धरा' 'पकडा' अशा शब्दांचा गजर कानीं पडला. ह्मणून बाहेर बघतात तों आलेल्या लोकांनीं छावणीस घेरा घालून आंतील लोक वेढून टाकिले. अशा समयीं काय करावें व कसें मुक्त व्हावें ही पंचाईत पडणें साहजिक आहे. तेव्हां लंगडीराय ह्मणून सरदार होता, त्याजवळ दोन हजार घोडा देऊन त्यास शत्रूला तोंड द्यावयाचा हुकूम दिला. हा लंगडीराय ह्मणजे पूर्वी महोवाचे लढाईत जो संजमराय ह्मणून राजाचा सरदार पडून सदेह स्वर्गी गेला त्याचा मुलगा होय. संजमराय सदेह स्वर्गी गेला असतां त्याजबद्दल लोक असें ह्मणूं लागले कीं, 'तो मेला व स्वर्गी गेला वगैरे गप्पा असून तो लढाईत जीव बचावून पळून गेला व लपूनच कोठें तरी आहे.' हा अपवाद त्याचा मुलगा लंगडीराय यास ऐकवत नसे. परंतु काय करितो बिचारा? त्यानें पृथ्वीराजास नेहमीं ह्मणावें कीं, 'असा कांहीं पराक्रम दाखविण्याचा प्रसंग आला ह्मणजे तिकडे माझी योजना करा.' व त्याप्रमाणें ह्या वेळीं त्याची योजना केली. तों त्याला सामना देण्याकरितां शत्रूकडील रावण कोतवाल हाही आपले हाताखालीं तीन लाख सैन्य घेऊन पुढें आला व कापाकापी सुरू झाली. हें युद्ध प्रहरभर दिवसास सुरू झालें तें तीन प्रहर दिवस येईपर्यंत चाललें होतें. इतक्या अवकाशांत जयचंदाकडचे लोक दोन लक्षांवर पडले! लंगडीरायाकडीलही मनुष्यसंहार बराच झाला. परंतु जयचंदाकडचा नाश फार झाला. इतका वेळ लंगडीराय सारखा झुंजत होता. शेवटीं क-

नौज किल्ल्यावर 'किलकिला' नांवाची प्रचंड तोफ होती तिला बत्ती देऊन लंगडीरायावर तिचा नेम धरिला, त्याबरोबर तो त्या आघातानें खालीं पडला व ठार झाला. ही किलकिला तोफ ह्मणजे देवीरूप असून लंगडीराय हा देवीभक्त असल्यामुळें त्या तोफेचा त्याजवर प्रयोग होणार नाहीं असें वाटून, त्या देवीरूप तोफेला दोन टोणग्यांचे बळी दिले. पहिल्यानें तीन वेळां त्याजवर तिचा प्रयोग केला. परंतु तीनही वेळ तोफेचा गोळा फक्त त्याचा कान चाटून गेला. तो शेवटीं बलिदानाचा वगैरे संस्कार केल्यावर मारला गेला. तों जयचंदाचे अवशिष्ट एक लाख लोक होते तेही खपले जाऊन अखेरीस पृथ्वीराज तर मुळींच सांपडला नाहीं. तेव्हां जयचंदानें स्वतः वीस लाख घोडा घेऊन पृथ्वीराजाचे लोकांवर जाण्याचा निश्चय केला.

ह्या सर्व सैन्यभाराचा विस्तार आणि देखावा फारच भयंकर व साश्चर्य करणारा होता. असल्या सैन्योदधीकडे बघून मनाची साहजिक कल्पना व्हावयाची कीं, त्या सैन्याकडून कोणाचा तरी घातपात व नाश व्हावयाचा व त्यामुळें मनाला एक प्रकारची भयानकता वाटावी. चंदानें ह्या सैन्याचें जें वर्णन केलें आहे तेंही असेंच आहे. तो ह्मणतो, 'हें सैन्य पृथ्वीला देखील जड भासत होतें. मांसवसा खाऊन तृप्ति पावणाऱ्या रणदेवता व गृध्रादि खादाड पक्षी यांस आनंद झाला वगैरे.' या सर्व सैन्यावर खुद्द जयचंद हा आपल्या घोड्यावर बसून उत्तरेकडून दक्षिणेकडे पहाणी करीत फिरत होता.

हा सर्व प्रकार एकीकडे चालला असतां व ह्यामुळें पृथ्वीराजाला काळजी आणि अस्थैर्य हीं उत्पन्न व्हावीं असें असतां, त्याचें मन एका गोष्टीनें शृंगारिक विषयांत गढून गेलें होतें. तो प्रकार असा. पृथ्वीराज आपला सेवकवेष टाकून खऱ्या राजवस्त्रांनीं भूषित होऊन फिरत

---

१. या इतिहासांतील सर्व लढाया बहुतकरून तीर, तरवारी आणि रथ या सामग्रीनेंच झालेल्या दिसतात. परंतु ह्या ठिकाणीं मात्र तोफेचें नांव आलें आहे. यावरून त्या वेळीं इकडे तोफांना नुक्तीच सुरुवात झाली असावी.

असतां एक उत्कृष्ट महाल त्याचे दृष्टीस पडला. त्या महालांत एक पंधरा वर्षांची, सुरूप, देखणी आणि यौवनानें भरलेली मुलगी बघून तो तिजवर अगदीं मोहित झाला. तिनें अंगावर फार मोलवान् वस्त्राभरणें परिधान केलीं होतीं. गळ्यांत मोत्यांचा हार, पायांत नूपुरें व हातांत हिऱ्याचीं कांकणें घातलीं होतीं. डोळ्यांत काजळ असून नाकावर, गालांवर आणि कपाळावर गोंदलेले सुंदर तिलक होते. तिचा पीतगौर वर्ण असून तिच्या गालांवर गुलाबी छटा असल्यामुळें तिचें तोंड गुलाबाच्या फुलासारखें सुकुमार आणि मनोहर दिसत होतें. अशी ती रूपयौवनसंपन्न स्त्री खिडकींत येऊन क्षणभर बाहेर दृष्टि देऊन पाहते आहे तों तिणें महालाच्या खालींच गंगातटीं आपल्या घोड्यास पाणी पाजीत असलेली पृथ्वीराजाची मदनासारखी मूर्ति बघून, ती तशीच तेथें तटस्थ झाली. पुढें क्षणमात्र दोघांची एकमेकांकडे दृष्टादृष्ट होते आहे तों तीं दोघेंही एकमेकांच्या दृक्शरानें विद्ध होऊन निर्व्यापार झालीं. त्यांची दृष्टि एकमेकांकडे जाऊन इतकी खिळली कीं, त्या उभयतांस भोंवतालीं काय चाललें आहे हें कांहींच दिसेनासें झालें. पृथ्वीराजाची दृष्टि वरील सुंदरीकडे जाण्यापूर्वी तो घोड्याला पाणी पाजण्यांत व गंगातटींची मजा पाहण्यांतच गुंतला होता. त्या वेळीं वर लिहिलेल्या सुंदरीचें त्याजकडे लक्ष गेलें होतें व त्यानें आपल्याकडे बघावें असें ती इच्छीत होती. इतक्यांत पृथ्वीराजाच्या घोड्याचे माळेंतील एक मोतीं तुटून पाण्यांत पडलें व तें मोतीं धरण्यास पाण्यांतल्या माशांच्या झुंडींच्या झुंडी एकदम पुढें धावल्या. त्यामुळें पाणी खळबळून माशांचीही एक मौज दिसूं लागली. तेव्हां तीच मजा पाहण्याकडे पृथ्वीराजाचें लक्ष लागल्यामुळें त्यानें पुढें एकेक मोत्याचा दाणा माळेंतून काढून पाण्यांत टाकीत जावा व तो धरण्यास माशांची गर्दी एकमेकांवर उड्या टाकून पुढें येत जावी. हा देखावा पाहण्यांतच त्याची पुष्कळ वेळ गेली, व त्या अवधींत त्या तरुणीलाही त्याचें रूप नीट रीतीनें पाहण्यास पुष्कळ वेळ सांपडली. तिणें मनसोक्त रीतीनें याचें यथेच्छ रूपनिरीक्षण केल्यामुळें तिची त्याजविषयींची इच्छा अधिकाधिक बळावत चालली. पुढें घोडेस्वाराची (पृथ्वीराजाची)ही

दृष्टि तिजकडे जाऊन नंतर काय देखावा झाला तो वर सांगितलाच आहे. ह्याप्रमाणें तीं दोघेंही एकमेकांकडे पाहात आहेत तों पृथ्वीराजाकडे एक दासी येऊन तिणें त्यास हांक मारिली. तेव्हां त्याचें चित्त त्या युवतीकडून निघून जरा चलित झालें. त्या दासीनें लगबगीनें पृथ्वीराजाकडे येऊन, 'ज्या तरुणीकडे तुह्मी बघत आहां तिणेंच तुह्मांला बोलावण्याकरितां मला पाठविलें आहे,' असें सांगितलें. हा तिच्या तोंडून निरोप ऐकिल्याबरोबर त्याला परमावधीचा आनंद झाला. परंतु त्यानें तिजबरोबर जाण्याचें कबूल करण्यापूर्वी त्या दासीला, ती सुंदरी कोण, काय, वगैरे विचारून तिजबद्दलची माहिती समजून घेतली. तेव्हां तिणें सांगितलें कीं, 'ती राजा जयचंद याची प्रसिद्ध रूपवती कन्या संयोगता असून तिणें आपल्याला वरण्याचा पूर्वीच निश्चय केला आहे. आपण तिच्या महालांत येण्याची तसदी घेऊन तिला धन्य करावें.' हें दासीचें भाषण ऐकून राजाचा आनंद त्रैलोक्यांत मावेनासा झाला. ही दासी ह्मणजे, जी पूर्वी पृथ्वीराजाचे आश्रयास असून पुढें त्याचा आश्रय सोडून संयोगतेकडे येऊन राहिली होती तीच कुशल, चाणाक्ष आणि चतुर अशी कर्नाटकी दासी होती.

दासीचा निरोप ऐकून ज्याप्रमाणें अंधळ्यास डोळे अथवा कृपणास धन मिळून जसा त्यास हर्ष होतो, तद्वत् पृथ्वीराजाला हर्ष झाला. त्यानें दासीचा निरोप मान्य करून लागलाच संयोगतेच्या महालांत जाण्याचा निश्चय केला. परंतु त्या वेळीं त्याच्या हें लक्षांत आलें नाहीं कीं, हा जो मी शत्रुकन्येच्या महालांत चोरून लपून आणि अशा आणीबाणीच्या वेळेस जातों आहें, त्या माझी पुढें गति तरी काय होईल? ह्याबद्दलचा त्याचे मनांत विचारच नाहीं. परंतु 'कामांधो नैव पश्यति' हें वाक्य जर अनेक अनुभवांतीं सत्य असें ठरलें आहे, तर त्यास कामातुर पृथ्वीराज हा तरी कां अपवाद होईल? त्याला असें झालें कीं, घोड्यावरून उडी मारून एकदम संयोगतेजवळ खिडकींतून जाऊन पडावें! पण मनुष्य ह्मणजे कांहीं पक्षी नव्हे. नंतर त्याणें दासीच्या मागें त्या महालाची वाट धरिली. जाऊं लागण्यापूर्वी त्याणें गंगाकिनारीं एका पडशाळेंत आपला घोडा बांधिला व नंतर कर्नाटकीच्या बरोबर एका

गुप्त दरवाज्यानें तो आंत शिरला. राजाला संयोगतेनें आणि संयोगतेला राजानें बघून तीं उभयतां कांहीं वेळ एकमेकांकडे टकमक टकमक पहातच स्तब्ध उभीं राहिलीं. कंठ सद्गदित झाला. कोणाचाच कोणाशीं बोलण्यास शब्द फुटेना. उभयतांनाही आपल्या भेटीचा परिणाम चांगला नाहीं असें वाटून अंगाला कंप सुटला. ह्याप्रमाणें सुमारें दोन घटका त्यांची स्थिति तशी राहिली. कोणीं कोणाशीं बोलण्यास सुरुवात करावी हें त्यांस कांहींच सुचेना. शेवटीं, पुरुष हा स्त्रीपेक्षां विशेष निर्लज्ज असल्यामुळें राजाकडूनच बोलण्याची सुरुवात झाली—

**पृथ्वीराज**—सुंदरी, तुझ्या रूपयौवनाला मी भुलून जाऊन कामविव्हल झालों व तूं मला येथें बोलावून आणिलेंस येणेंकरून माझा मोठा मान झाला असें मी समजतों.

**संयोगता**—प्राणनाथ, मीं आपल्या रूप, गुण, व पराक्रमावर लुब्ध होऊन आपल्यास वरावें असा निश्चय केला आहे. त्याप्रमाणें आपल्या प्रेमालिंगनापूर्वीं आपला विवाहविधि झाला पाहिजे व तो गांधर्वविधीनेंच येथें उरकला पाहिजे ह्मणजे मी आपली शास्त्रोक्त पत्नी झालें असें होईल.

ह्याप्रमाणें उभयतांचीं भाषणें चाललीं असतां तेथें कर्नाटकी दासी उभी होतीच; तिनें गंधाक्षता व पुष्पमाला यांची तयारी करून आणिली. मग विवाहाला काय उशीर? कुमारिकेनें पृथ्वीराजाला गंधाचा तिलक लावून त्याचे गळ्यांत माळ घातली आणि हातांत कंकण बांधून मस्तकावर अक्षता टाकिल्या; व त्याचप्रमाणें पृथ्वीराजानेंही संयोगतेला कुंकुमतिलक लावून तिच्या गळ्यांत माळ घातली. ह्याप्रमाणें त्या उभयतांचा गांधर्वविधीनें विवाह आटोपला. नंतर त्या दिवशीं रात्रीं पृथ्वीराज संयोगतेच्या महालांतच राहिला. त्यानें ती अवघी रात्र कुमारी संयोगता इच्या समवेत नानाप्रकारच्या क्रीडा आणि करमणुकी करण्यांत घालविली व त्या अवधींत त्याला एक पळभरही संयोगता दृष्टीआड झालेली सहन होईनासें झालें. परंतु पहांट होऊन पक्ष्यांचे किलकिलाटानें व राजाचे नगारखान्यांतील चौघड्यानें

त्याचें मन एकाएकीं पूर्वस्थलीं येऊन आतां आपल्यास येथून निघून गेलें पाहिजे असें वाटलें व तो त्या वियोगदुःखानें अगदीं कासावीस झाला. त्याला सर्व रात्रभर भोगिलेले विलास केवळ स्वप्नवत् वाटूं लागले. पूर्वदिवशीं जेव्हां तो कनौज शहराची शोभा बघत झुकत झुकत कुमारी संयोगतेच्या महालाकडे आला त्या वेळीं लंगडीराय हा जयचंदाचे फौजेबरोबर लढण्यांत गुंतला होता. त्याचीही पुढें काय वाट झाली त्याविषयींची हकीकत त्यास कांहींच कळली नव्हती; ती एक त्यास काळजी होतीच. पूर्वी सांगितल्याप्रमाणें लंगडीरायावर किलकिला नांवाची तोफ सोडून त्याचा नाश केला; त्या तोफेचा मोठा आवाज पृथ्वीराजानें संयोगतेच्या महालांत असतांना ऐकिला होता. त्याचप्रमाणें हजारों वीरांचें ओरडणें आणि कलकलाट राजाला महालांत ऐकूं येत होता, त्यावरून आपल्या पक्षाकडे कांहीं तरी अनर्थ ओढवला असावा असा त्यानें तर्क केला. परंतु हा अनर्थ कोणता आणि कसा होता हें कांहीं त्यास कळलें नव्हतें व कळण्यास मार्गही नव्हता. ह्या सर्व गोष्टी मनांत आणून त्यानें महालांतून लौकर बाहेर पडण्याचा निश्चय केला. परंतु, त्याच वेळीं संयोगतेचा किंचित् डोळा लागला होता. तेव्हां तिला जागी करून व तिचा निरोप घेऊन जावयाचें त्याला मोठें संकट पडलें. शेवटीं, त्यानें धीर करून तिला जागें केलें व निरोप घेऊन तिचें शेवटचें चुंबन घेतलें. पृथ्वीराजानें जाण्याचा हेतु कळविल्यावर संयोगतेला फारच दुःख वाटलें. परंतु निरुपाय होऊन शेवटीं मोठ्या कष्टानें त्यांनीं एकमेकांस आलिंगन दिलें व पृथ्वीराजापासून संयोगतेनें पुनः लौकर भेट देण्याचें वचन घेऊन त्याला निरोप दिला.

पृथ्वीराज संयोगतेच्या महालांतून बाहेर पडतो तों त्यास शंभर पठाणांची एक टोळी भेटली. त्यांनीं पृथ्वीराजास महालांतून निघतांना पाहिल्यावरून, हा मनुष्य या वेळीं जनानखान्यांतून काय ह्मणून जाऊन आला, याविषयीं त्यांस शंका आली; व त्यांनीं पृथ्वीराजाकडे निरखून पाहून हा कोणी तरी परकीय मनुष्य आहे असें जाणिलें व लागलेच ते त्याजवर चालून गेले. तेव्हां राजानें त्यांजवर तीन

बाण सोडिले. त्यांत एका बाणानें त्यांचा मुख्य **फिरोजखां** ह्मणून होता तो विद्ध होऊन मरून पडला व दुसऱ्या दोन बाणांनीं **जलालखां** आणि **अमलखां** हे दोघे पठाण पडले. तों ते अधिकाधिकच जवळ येत चालले. तेव्हां **पृथ्वीराजानें** आपली तरवार काढून अशा सफाईनें पट्टयाचे हात चालविले कीं, त्या सपाट्यांत त्या टोळीपैकीं एकही मनुष्य सुध्या रीतीनें जाऊन झालेली हकीकत **जयचंदास** कळविण्यास उरला नाहीं. ह्याप्रमाणें आलेल्या विघ्नांतून **पृथ्वीराज** पार पडून आपल्या गोटांत दाखल झाला. तेथें त्याचा चुलता **कन्ह चव्हाण** होता त्याजवळ जाऊन तो त्याचे पायां पडला. तेव्हां पुढें त्यांचा खालीं लिहिलेला संवाद झाला—

**कन्ह**—अहो राजाधिराज, आपल्या हातांत हें कंकण कसलें बांधिलें आहे? कपाळीं गंधाचा तिलक कोठून लाविला? आणि हीं मंगल-चिन्हें कोणापासून मिळविलीं? हीं सर्व लग्नचिन्हें दिसत असून तूं ब्राह्मण किंवा वाणी या लोकांसारखी बायकोला माहेरीं ठेवून एकटाच कसा आलास? ही **क्षत्रियांची** रीति नव्हे.

**पृथ्वीराजानें** झालेली सर्व हकीकत काकास सांगितली आणि ह्मणाला, 'काका, आपण ह्मणतां ही गोष्ट खरीच आहे, कीं **क्षत्रियानें** आपली पत्नी आपल्याबरोबर न्यावी परंतु नीतिशास्त्रांत पुढें लिहिलेली नीति सांगितली आहे:—

**'यज्ञकालेषु धर्मेषु कामकालेषु शोभिता ।**
**सर्वत्र वल्लभा बाला युद्धकाले न शोभिता ॥'**

ह्मणजे—'यज्ञसमयीं, धर्मसंबंधांत आणि शय्याकालीं सर्वदा स्त्री बरोबर असावी व तीच काय ती त्या तीन गोष्टींची शोभा आहे. परंतु युद्धसमयीं बरोबर असण्यांत कांहीं शोभा नाहीं.'

**कन्ह**—अरे, पण ही गोष्ट घरून बाहेर युद्धास निघावयाचें असलें तर तेव्हांची आहे. परंतु आपण मुळींच राक्षसीविवाह करण्याच्या हेतूनें बाहेर पडलों. व तो हेतु साधला तरी रूढींतली वहिवाटच कायम ठेवण्याकडे तूं लक्ष दिलेंस हें चांगलें केलें नाहीं.

**पृथ्वीराज**—महाराज, तें खरें. पण कसेंही झालें तरी येथें **जयचंदाबरोबर** युद्ध करावें लागणारच; आणि अशा प्रसंगीं या स्त्रीचें लोढणें

बरोबर वागवावयाचें ह्मणजे फारच कठिण होय. आतां दिल्लीस आपण कसेबसे जाऊन पोहोंचलों ह्मणजे मागाहून या वरिलेल्या कुमारिकेस घेऊन जाण्याची तजवीज करितां येईल. तिच्याविषयीं आपण अगदीं काळजी करूं नका. ती आतां दुसऱ्या कोणास वरणार नाहीं ही माझी खात्री आहे.

**कन्ह**—राजा, तूं कांहींएक काळजी करूं नकोस. लाभलेलें रत्न घेऊन तूं बिनदिक्कत आपला दिल्लीस निघून जा. आमचा कंठगत प्राण होईपर्यंत आह्मी, तूं दिल्लीस सुखरूपपणें पोंचता होशील इतकी खबरदारी आणि व्यवस्था ठेवितों.

कन्हाच्याच ह्मणण्यास चंद पुंडीर याचेंही अनुमोदन पडून तो ह्मणाला, 'खरोखर, कन्ह काका ह्मणतात याप्रमाणेंच केलें पाहिजे. आह्मी आपली पाठराखणी हव्या त्या रीतीनें करूं. परंतु आपण प्राप्त झालेलें स्त्रीरत्न दवडून अथवा सोडून यावें हें चांगलें नाहीं.'

येणेंप्रमाणें मुख्यमुख्यांचीं काय काय ह्मणणीं व मतें होतीं तीं पृथ्वीराजानें ऐकिलीं व त्याप्रमाणें कुमारी संयोगता इचें हरण करण्याचें ठरविलें. दुसरे दिवशीं रात्रीं पृथ्वीराज कांहीं सामंतमंडळी बरोबर घेऊन संयोगतेच्या महालांत गेला.

हा दिवस ह्मणजे चैत्र शुद्ध पौर्णिमा असून रात्रीं दोन प्रहरांचा अंमल झाला होता. त्या दिवशीं निरभ्र असून पिठासारखें स्वच्छ चांदणें पडलें होतें. जिकडे तिकडे शांत होतें व त्या शांततेमुळें गंगेच्या प्रवाहाचें घोंघावणें विशेष मोठ्यानें ऐकूं येत होतें. अशा वेळीं संयोगता, आपला प्रियभर्ता वचनाप्रमाणें आपल्याशीं विलाससुख भोगण्यास येईल ह्मणून वाटेकडे डोळे लावून सचिंत अशी, आपल्या अयनेमहालाच्या बाजूस असलेल्या बगीचाचे जवळील खिडकीशीं रेशमी गादीवर बसली होती. वाट बघून बघून मध्यरात्र झाली तरी अजून प्राणनाथ येत नाहींत असें पाहून ती अगदीं आतुर झाली होती. इतक्यांत तिला कोणी आल्याची चाहूल ऐकूं येऊन, तिला आपला प्राणपति आला असें वाटून समाधान झालें. परंतु पुढें पाहते तों एकाचे ठिकाणीं आठ नऊ पुरुष तिच्या दृष्टीस पडून ती

घाबरून गेली. तरी त्यांत एक पृथ्वीराज असून बाकीचे सात आठ अनोळखी आहेत असें तिला आढळलें व जरा समाधान वाटलें. नंतर तिनें पृथ्वीराजास एकांतीं विचारिलें कीं, 'आपण एकटेच येथें याव-याचे ते हे आणखी परकीय लोक कोण बरोबर आणिले आहेत? तरी त्यांची सरबराई दासी करील; आपण विलासमंदिरांत चलावें.' पृथ्वी-राजानें सांगितलें कीं, 'मी आज येथें विलाससुख भोगावयास आलों नाहीं व मला आज येथें राहावयाचें नाहीं. तूं आज आमच्या नगरास चाललें पाहिजे.' ह्या ह्मणण्यास संयोगतेचा सर्वांशीं रुकार पडला. परंतु तिनें पृथ्वीराजाला सुचविलें कीं, 'मला आपण आपल्याबरोबर दिल्लीस घेऊन जाल, पण माझे बापाच्या बलाचा आणि क्रोधाचा कांहीं विचार केला आहे काय? माझ्या जाण्यानें सहसा आपल्यावर कांहीं अनर्थ ओढवूं नये ही माझी इच्छा आहे.'

वर जे सात आठ सामंत पृथ्वीराजाबरोबर होते ह्मणून सांगितलें त्यांचीं नांवें हीं होतीं:—कन्ह चव्हाण, गोविंदराय गेहलोट, सलख प्रमार, हाहुलीराय हमीर, अल्हन परिहार, चंद पुंडीर, जाम यादव, व नीरधरराय. संयोगतेची चिंता आणि काळजी काय आहे ती सामंतांस कळतांच कन्हानें तिला सांगितलें कीं, 'सूनबाई, तुझ्या बापाकडून पृथ्वीराजावर कांहीं प्रसंग गुदरेल वगैरेची भीति तुला बिलकुल वाटूं देऊं नकोस. आमच्या जिवाला, तर तुह्मां दंप-त्याच्या केंसाला भीति, असें समजा. आह्मी तुमची पाठराखणी कर-ण्यास सर्वांशांनीं सिद्ध आहोंत.' याचप्रमाणें इतर सामंतांनींही संयो-गतेची चिंता आणि काळजी दूर करून मोठ्या अभिवचनपूर्वक तिचें समाधान केलें. शेवटीं, याविषयींचा विचार काय तो एक ठरवून संयोगतेनें पृथ्वीराजाबरोबर निघण्याची तयारी करावी; उगाच संश-यांत व भीतींत पडून विलंब लावूं नये. कनौजापासून दिल्ली ९५ कोस लांब आहे, इतका पल्ला जयचंदाच्यानें आक्रमण करवावयाचा नाहीं, व कदाचित् ह्या नूतन दंपत्याचा पाठलाग करीत जर तो निघालाच तर ठिकठिकाणीं त्याला आडवून त्याचा बेत विस्कलित करण्यास सर्व सामंतांनीं इभ्रतीप्रमाणें व अभिवचनाप्रमाणें तयार असावें; असें

ठरून, संयोगता पृथ्वीराजाबरोबर जाण्यास सिद्ध झाली. तेव्हां पृथ्वीराजानें तिला आपल्या पाठीशीं घोड्यावर बसविलें आणि जो घोडा काढला तो थेट दिल्लीस येऊन दाखल झाला.

कनौजाहून निघतांना पृथ्वीराजानें चंदास सांगितलें कीं, 'मी संयोगतेला घेऊन दिल्लीस निघून गेलों हें जयचंदास कळीव; व येणेंप्रमाणें त्याचा यज्ञ पूर्णपणें बंद पाडण्याचा जो हेतु होता तो शेवटास तर नेलाच, परंतु, त्याची कन्याही हरण करून नेली हें सांग.' चंद म्हणाला, 'एवढी अभिमानोक्ति आपल्याला पाहिजे कशाला? करावयाच्या गोष्टी कराव्या; त्याबद्दल आपल्या मुखानें गर्व कशाला वहावा?' परंतु पृथ्वीराजानें त्याला हें कळविण्यास जयचंदाकडे पाठविलेंच.

चंदाचें हृदयभेदक सांगणें जयचंदानें ऐकिल्याबरोबर त्याच्या सर्वांगाचा संताप होऊन त्या क्रोधावेशांत त्यानें एकदम आपल्या सर्व फौजेस त्या कन्याहरण करणाऱ्या चोराचा पाठलाग करण्याचा हुकूम दिला. पृथ्वीराज तर कनौजाहून निघून दिल्लीच्या मार्गासही लागला. त्याचा पाठलाग करण्यास निघालेल्या फौजेला अटकाव करण्यासाठीं वर लिहिल्याप्रमाणें पृथ्वीराजाची साह्यकर्ती सामंतमंडळी सिद्ध होतीच. जयचंदाची फौज पृथ्वीराजाचा पाठलाग करण्यास निघाली तों पहिल्या मुक्कामासच गोविंदराय गेहलोट यानें तिजला पुढें जाण्याविषयीं अटकाव केला. या चकमकींत जयचंदाचे बरेच लोक पडले. परंतु ज्याचा लक्षावधि लोकांचा दळभार, तेथें मूठभर लोकांचा काय पाड? मागून पुनः दुसरी भरती येऊन त्यांनीं शेवटीं गोविंदरायास तर ठार केलें व पुढच्या मुक्कामास निघाले. तों तेथें चंद पुंडीर हा त्यांस अवरोध करण्यास आपल्या फौजेसहवर्तमान सिद्ध होता. त्यानेंही जयचंदाकडील बहुत लोकांचा संहार केला; परंतु शेवटीं तोही धारातीर्थीं पडला. त्यानंतर आतताई हा त्या सेनासमुद्रास आडविण्यास पुढें आला. त्याजवर जयचंदाकडचा कहर कंठीर म्हणून सरदार आला. त्याचा थाट कांहीं विलक्षणच होता. त्याजबरोबर एकहजार लोक नुसते शंख वाजविणारे असून त्यांशिवाय इतर सेनासमूह. त्याच्या डोक्यावर मयूरपिच्छांचें एक शिरोभूषण

होतें. असा तो आततताईवर चालून आला. त्यानें आततताईच्या फौजेची फळी फोडली आणि तशीच पुढें चाल केली. तों तो, पृथ्वीराज व संयोगता हीं उभयतां घोड्यावर बसून चाललीं होतीं त्यांच्या अगदीं पाठीशीं येऊन ठेपला. नंतर त्यानें मोठ्या आवेशानें पृथ्वीराजास आडवून त्याचे गळ्यांत आपली कमान अडकवून त्याला खालीं खेंचलें. तितक्यांत संयोगतेनें दातानें त्या कमानीची दोरी तोडून पृथ्वीराजास सोडविलें आणि त्यांनीं आपला घोडा पुढें फेंकला. हें कृत्य बघून कहर कंठीर परतला आणि त्यानें जयचंदास सांगितलें कीं, 'पृथ्वीराज हा बळानें आपल्या कन्येचें हरण करून चालला आहे असें नसून कुमारी संयोगता इचें त्याला पूर्ण आनुकूल्य आहे, ह्मणूनच त्यानें एवढें साहस केलें; व याकरितां तिला सोडवून आणण्याच्या भरीस पडण्यांत कांहीं अर्थ नाहीं.' असें सांगून पुनः आततताईबरोबर युद्ध करण्यास आला. तों असा चमत्कार झाला कीं, त्यांची झटापट होत असतां त्यांनीं एकमेकांस तरवारीनें एकसमयावच्छेदेंकरून असे वार केले कीं, त्याबरोबर त्या दोघांचीं मस्तकें तुटून पडलीं आणि तीं दोन्ही कबंधेंच कांहीं वेळ लढत राहिलीं. ह्याप्रमाणें त्या दोघां वीरांचा अंत झाला.

कहर कंठीर हा प्रमारकुलोत्पन्न असून तो जयचंदाचे सेवेस कसा आला वगैरेची हकीकत चंद भाटानें लिहिली आहे ती अशी. चंद ह्मणतो, 'ही सर्व पृथ्वी ह्मणजे प्रमारकुलाची असून त्यांनीं ती सार्वभौम या नात्यानें आपल्या इतर मांडलिकांस विभागून दिली. ती पुढें लिहिल्याप्रमाणेंः—

> "दियो दिल्ली तुंवरां, दई, पट्टन चाऊरां ।
> दिय संभरि चहुआन, दई कन्वज राठोरां ॥
> परिहारां मुरदेश, समा भट्टी सिंधुतट ।
> दई सोरठ जाधवां, दइ इच्छिन सुभाग पट ॥
> चारनां कच्छ दीनी धरा, भट्टां पूरव भावही ।
> बनी गवो नृपति बंटी धरा, गिरिजापति माला गृही ॥"

ह्मणजेः—"तुवरांस दिल्ली, चावड्यांस पाटण, चव्हाणांस अजमीर, राठोडांस कनौज, परिहारांस मारवाड, समा आणि भट्टी यांस सिं-

धुनदीचे कांठचा मुलूख, जाधव ह्मणजे चूडासमा यांस सोरठ देश, दक्षिणेकडचा मुलूख भाटांस व कच्छ प्रांत जाडीचे रजपुतांस; याप्रमाणें सर्व पृथ्वीचें राज्य विभागून देऊन खुद्द प्रमार राजा आपल्या हजार बंधूंसहवर्तमान शिवतपश्चर्या करण्याकरितां विभागी होऊन अरण्यांत निघून गेला व माळ घेऊन शिवनामाचा जप करूं लागला."

येणेंप्रमाणें ही प्रमार मंडळी तपश्चर्या करीत असतां अरण्यांत एका राक्षसानें त्यांची गाय मारून भक्षण केली. तेव्हां हें गोवधाचें पातक आपल्यास लागलें असें समजून तत्प्रायश्चित्तार्थ त्यांनीं पिंपळाच्या लांकडांची चिता तयार करून त्या चितेंत देह टाकावयाचा निश्चय केला; व त्याप्रमाणें चिता प्रदीप्त करून त्यांत उड्या टाकणार इतक्यांत देवर्षि नारदमुनि तेथें अवतीर्ण झाले. त्यांनीं त्यांस सांगितलें कीं, 'क्षत्रियांनीं अग्निकाष्ठें भक्षण करून प्राण देणें हें गौण आहे; अग्निकाष्ठभक्षण ब्राह्मणांना योग्य आहे; परंतु क्षत्रियांना जर आपले प्राण देणें असतील तर त्यांनीं धारातीर्थी आपले देह पाडावे हें इहपरत्र कीर्तिसुखावह आहे.' इतकें सांगून नारदमुनींनीं त्यांस, 'असा धारातीर्थी पडण्याचा प्रसंग, जयचंद राजा हल्लीं यज्ञ करीत आहे त्या यज्ञाच्या संबंधानें येणार असून त्यांत तुह्मी आपलें शौर्य व पराक्रम गाजवून मृत्यु पावाल व तसें मरण तुह्मांस विशेष श्रेयस्कर होऊन तुह्मांला गंगानदीतीरीं मुक्ति मिळेल,' असें सांगितलें. परंतु प्रमार हा परम शांत व अक्रोध असल्यामुळें लढण्याचा प्रसंग यावा कसा? हा प्रश्न होताच; त्याजविषयीं नारदानें सांगितलें कीं, जयचंद आपली कन्या तुला देण्याचें योजील; परंतु ती पृथ्वीराज घेऊन जाईल व त्यामुळें तुला आपला अपमान झालासें वाटून क्रोध येईल आणि नंतर होणाऱ्या गोष्टी घडून येतील.' त्याप्रमाणें वरील प्रसंग घडून आला आणि प्रमाराचा अंत झाला.

प्रमारास मारणारा आतताई याची गोष्टही अशीच चमत्कारिक वर्णिलेली आहे. आतताई हा जन्मला तेव्हां कन्या होता. परंतु त्याचा बाप चौरंगी चव्हाण यानें चुकून बाहेर पुत्राचीच बातमी लोकांमध्यें पसरविली होती. परंतु पुढें खरी हकीकत कळल्यावांचून

राहणार नाहीं असें वाटून त्याला मोठा पश्चात्ताप झाला. पण त्यावि-षयीं कांहीं उपाय नव्हता. शेवटीं, एके दिवशीं, त्यानें त्या मुलीला शंक-राचे देवळांत नेऊन तिला व आपल्याला शंकराचे मस्तकावर अर्पण करण्याचा निश्चय केला आणि शंकराचे देवळांत जाऊन, पहिल्यानें मुलीला मारून शंकरास अर्पण करावें आणि नंतर आपलें मस्तक तो-डून वाहावें असा बेत करून देवळांत क्षणभर शिवाचें ध्यान व स्म-रण करीत बसला. त्याचा दृढनिश्चय पाहून शिव प्रसन्न झाला आणि त्यानें त्याचें संकट दूर केलें. ह्मणजे, आततताई ही जी कन्या होती तिचा पुत्र करून त्याच्या बापास शिवानें सांगितलें कीं, 'हा मोठा पराक्रमी व कीर्तिमान् होईल, असा माझा ह्याला आशीर्वाद आहे.'

ह्याप्रमाणें वरील दोघे वीरपुरुष धारातीर्थीं मृत होऊन पडले. आ-तताई पडल्यावर जयचंदाची फौज पुढें लोटत चाललीच होती. तिला हरकत करण्यास काशीराजा पुढें सरसावला व त्याशीं साम-नेवाला जयचंदाकडील हमीर हाडा ह्मणून होता. त्यांनीं दिवसभर लढाई करावी आणि संध्याकाळ झाला ह्मणजे आपापल्या गोटांत जा-ऊन विश्रांति घ्यावी. ह्याप्रमाणें तीन दिवस सारखें युद्ध चाललें होतें. जयचंदाकडचीं लाखों माणसें या समरयज्ञांत बळी पडलीं; व तशींच पृथ्वीराजाकडचींही निवडक निवडक मनुष्यें खपलीं. काशीराज, हरिसिंह, कनक गुजर, नीरधरराय, कन्ह, अल्हन कुमार परिहार, ही मंडळी अनुक्रमें शौर्यपराक्रम करून एकामागून एक पडली. यां-तील शेवटचा अल्हन परिहार हा पृथ्वीराजाचा भाचा असून मोठा धाडसी होता. एके वेळीं तो हजामत करायास बसला असतां पृथ्वी-राजास राग येऊन तो त्याला बोलला; तेव्हां तें त्याला सहन न होऊन तो एकदम तरवार उगारून पृथ्वीराजावर धांवला; आणि त्यानें त्याच्या रागाचें कारण विचारिलें. राजानें सांगितलें कीं, 'शूरांचें म-स्तक ह्मणजे साधारण मनुष्याचें मस्तक नसून तें केवळ राजाचेंच मस्तक आहे असें लोक समजतात व एवढ्याकरितां मी तुला बोललों; यांत तुला उलट राग येण्याचें कारण नाहीं.' राजाचें बोलणें ऐकून त्याला तें सत्य वाटलें व त्यानें विचार करून असें सांगितलें कीं, 'मा-

मासाहेब, आपण, आह्मां शूर पुरुषांचें मस्तक ह्मणजे आपलें मस्तक इतकेंच समजूं नका. पण आमचे देहही तुमचेच आहेत असें समजा.' असें ह्मणून त्यानें आपल्या हातें आपलें मस्तक कापून राजाचे हातांत दिलें आणि कापण्यापूर्वी सांगितलें कीं, 'हें मस्तक आपण दिल्लीस पोंचण्याच्या पूर्वी जमिनीवर ठेवूं नये. तसें केलें तर मात्र मोठा नाश होईल.' त्याप्रमाणें ही गोष्ट सर्व यथास्थित झाली असती तर पृथ्वीराजाला उत्तम प्रकारें यश व कीर्ति मिळाली असती. परंतु होणाऱ्या गोष्टी चुकत नाहींत. संयोगतेच्या परिणयापासून मोठमोठे अनर्थ उद्भवणार असें भविष्य असून तें सत्य व्हावयाचें असल्यामुळें सर्व गोष्टी विरुद्ध व्हावयाच्या असा ईश्वरी संकेत होता. त्यापुढें मनुष्याचा इलाज नव्हता. अल्हन यानें आपलें मस्तक छेदून पृथ्वीराजाजवळ दिलें आणि त्याचें कबंध रणभूमीवर युद्ध करूं लागलें. इकडे राजा त्याचें मस्तक घेऊन दिल्लीकडे चालला. जातां जातां संयोगतेला अतिशय तहान लागून तिचा घसा कोरडा पडला. तेव्हां राजानें एका कूपांतून तिच्याकरितां पाणी काढलें. परंतु संयोगतेनें असा हट्ट धरिला कीं, 'अल्हनचें मस्तक ज्या अर्थी हातांत आहे त्या अर्थी काढलेलें पाणी अपवित्र झालें. शवाच्या विटाळाचें पाणी पिण्याला योग्य नाहीं व तें मी पिणार नाहीं.' पृथ्वीराजानें सांगितलें कीं, 'हें मस्तक शव झालें नसून याचें धड अजून समरांगणांत लढत आहे.' पण स्त्रियांचा दुराग्रह फार असून त्या आपला हट्ट सोडीत नाहींत हें सर्वांस ठाऊकच आहे. पृथ्वीराजानें सांगितलें तरी संयोगतेची समजूत होईना व शेवटीं त्यानें तिच्या आग्रहावरून तें मस्तक दूर जमिनीवर ठेवून तिला पाणी काढून दिलें आणि तिची तृषा शांत केली.

परंतु या योगानें, अल्हन जो आपल्या नुसत्या धडानें लढत होता तो इकडे त्याचें शिर जमिनीला लागतांच, तोही जमिनीवर पडला. याप्रमाणें अल्हन पडल्याबरोबर जयचंदाचा सेनासमूह पुढें लोटून पृथ्वीराजाशीं अधिकाधिक लगट करण्यास आला. तों अचल भाटी, विजराज चालुक्य, लाखनसी वाघेल, व तुंवर पहाड, इत्यादि वीर अनुक्रमें त्या सैन्यास हरकत व अटकाव करण्यास आणि

त्याजबरोबर झुंजण्यास पुढें आले. पण त्या सर्वांची एकच गति झाली. सर्वजण धारातीर्थी पतन पावले. आणि पृथ्वीराज आपल्या नववधूस घेऊन मोठ्या दुःखाकष्टानें दिल्लीस येऊन पोंचला! त्याचे बरोबर हाहुलीराय हमीर, चंद भाट आणि रामगुरु पुरोहित हे तिघेजण मात्र वांचून दिल्लीस सुखरूप पावले. बाकीच्या सर्व सामंतांची समरयज्ञांत आहुती पडली. पृथ्वीराजाचे पाठोपाठच जयचंदही दिल्लीवर चालून आला. तों त्यानें आपली कन्या पृथ्वीराजाचे पाठीशीं बसली आहे अशी बघितली. तेव्हां तो मनांत विचार करून ह्मणाला, 'हर हर! मीं यज्ञ करण्यास सुरवात केली, त्यांत घृताचीं अवदानें द्यावयाचीं त्याचे ऐवजीं रक्ताचीं अवदानें दिलीं; व फलपुष्पें अर्पण करावयाचीं त्यांचे जागीं सुख, कीर्ति आणि लज्जा, यांचा होम केला! आणि हल्लीं पृथ्वीराजाचा पाठलाग करून दिल्लीला घेरा घातला आहे व आतां त्याला मी सहज पकडूं शकेन. परंतु येणेंकरून कन्या संयोगता इला परम दुःख होऊन पृथ्वीराजाचीही अब्रू व तारुण्य हीं व्यर्थ जातील आणि दिल्लीशहरच्या लोकांमध्यें अस्वस्थता उत्पन्न होईल. तेव्हां हा अनर्थ ओढवून घेण्यापेक्षां कन्येनें ज्याला मनोभावेंकरून वरिलें आहे त्यासच ती आपल्या हातानें दान करून सर्व अनर्थ टाळावा हें बरें.' असें ह्मणून त्यानें श्रीकंठ पुरोहिताला पाठवून कन्यादानाची तयारी करविली आणि दिल्ली येथें पृथ्वीराजाचें आणि संयोगतेचें लग्न लावून दिलें.

## भाग आठवा.

दिल्ली येथील लग्नोत्सव.—लग्नोत्सवसंबंधी मेजवान्या व करमणुकी.—

---

१. या युद्धांत अशीरगडचा टांक राजा व फ्रांक नांवाचा एक फ्रेंच सरदार असे दोघे होते, ह्मणून चंद भाट लिहितो. टांक राजे शालिवाहनाचे वंशांतील असून त्यांचें राहणें मुंगीपैठणास होतें. त्यांनीं तुवरवंशाचा शक बंद केला. पुढें तेच अशीरगडावर राहूं लागले. फ्रांक हा फ्रेंच जातीचा सरदार त्या वेळीं क्रुसेडच्या युद्धांतून हिंदुस्थानांत आला असेल व कोणीं क्षत्रियराजानें त्यास आपल्या पदरीं राखिलें असेल.

पृथ्वीराजास चक्षुःश्रवा ऋषीचा शाप.—पृथ्वीराजाचा मदांधपणा आणि असावधगिरी.—त्याला शुद्धीवर आणण्याचा उपाय.—त्याकरितां त्याला चिठ्ठी जाते.—संयोगतेच्या आज्ञेवरून तिच्या दासी चिठ्ठी नेणाऱ्या चंद भाट वगैरेंस मारितात.—राजा व राणी हींही त्यांचा उपमर्द करितात.—चंदाचा व हाहुलीरायाचा संवाद.—हाहुलीराय दिल्लींतून निघून जातो व दिल्लीवर महत्संकट.—हाहुलीराय गिझनीस जातो व शहाबुद्दीनास घेऊन दिल्लीवर येतो.—चितोडचा राणा समरसिंह रावळ हा दिल्लीचे रक्षणार्थ येतो.—समरसिंहाचें वर्णन.—तो पृथ्वीराजाकडे पोपटाबरोबर निरोप लिहून पाठवितो.—त्या संबंधानें पृथ्वीराज व संयोगता यांचें संभाषण.—राजाचें राजवाड्यांत आगमन.—समरसिंहाचा सत्कार व प्रजाजनांचें आनंददर्शन.—वीरभद्राचा आविर्भाव.—त्याचें भविष्यकथन.—भविष्यकथनानें राजाचा हवालदीलपणा आणि वीरभद्राकडून समाधान.—पृथ्वीराजाचें दुःस्वप्न.—त्याबद्दल संयोगतेकडून समाधान.—दुःस्वप्नशांत्यर्थ उपाय.—फौजेची तयारी आणि संयोगतेचा अभिप्राय.—पृथ्वीराज व संयोगता यांची शेवटची भेट.—पृथ्वीराजाकडील फौजेची व्यवस्था.—दोन्ही लष्करांचा सामना. पृथ्वीराज पकडला जातो.—समरसिंहाचा मृत्यु.—राजपुत्र रेणसी याचा मृत्यु.—या लढाईचें ठिकाण.—जयचंदाचा मृत्यु व कनौजाची उद्वस्तता—मुसलमानांचे पुंडावे आणि हिंदुस्थानांतील अराजकता.—पृथ्वीराजाचे अंताविषयीं दोन मतें.—चंद भाटाचें गिझनीस गमन व पृथ्वीराजाची भेट.—पृथ्वीराजाचा शब्दवेधचमत्कार पाहण्याची मसलत.—शब्दवेधचमत्कार पाहण्याची तयारी.—पृथ्वीराजास चंदाचा इशारा.—पृथ्वीराजाचें शरसंधान व शाहाबुद्दीनाचा शेवट.—पृथ्वीराज व चंद यांचा अंत.—उपसंहार.

संयोगता हरण करण्यांत काय काय अनर्थ गुदरले व कसकसे वीर महावीर समरांगणीं पडले हें येथपर्यंत सर्व सांगितलें. या वीरांशिवाय हजारों सैन्य मृत्युमुखीं पडलें तें निराळेंच. हा येवढा कहर झाला ह्मणून दिल्ली येथील त्यांचे इष्टमित्र आणि आप्त स्वकीय उदासीन होऊन रडत बसले असें झालें नाहीं. इतका मनुष्यसंहार झाल्यासारखा राजा विजयी अथवा हेतुसिद्ध होऊन सुखरूपपणें परत दिल्लीस आला ही महदानंदाची गोष्ट होय असें लोकांस वाटलें; व त्यांतही,

अशेषरूपवती व यौवनसंपन्न अशी कनौजच्या वलिष्ठ राजाची एकुलती एक कन्या हरण करून आणिली हा तर मोठाच पराक्रम केला. असें समजून दिल्लीच्या सर्व प्रजाजनांनीं, पृथ्वीराज दिल्लीस परत आला ह्मणून मोठा उत्सव केला. राजाच्या आगमनाचा उत्सव आणि त्यांतच जयचंदानें आत्मसंतोषानें दिल्लीसच कन्यादान करून केलेलें संयोगतेचें लग्न या दोन्ही समारंभांनीं दिल्ली शहर अगदीं गजबजून आणि नादावून गेलें. कनौजच्या संबंधानें झालेल्या रणकंदनांत पढलेल्या शूरांच्या पत्न्यांनीं सती जाण्याचा निश्चय केला, व त्याप्रमाणें ज्यांच्या ज्यांच्या पतींचीं शिरें मिळालीं त्यांनीं त्यांनीं त्या शिरांसहवर्तमान अग्निप्रवेश करून जन्माचें सार्थक केलें. परंतु ज्यांच्या पतींचा मागमूसच लागला नाहीं त्यांनीं तापसीवेष धारण करून रुद्राक्षमाला घेऊन ईश्वरभक्तींत आपलीं आयुष्यें घालविण्याकरितां एकांतवास पत्करिला.

राजाचा संयोगतेबरोबर विवाह झाल्यामुळें लोकांस परमानंद झाला हें वर सांगितलेंच. या विवाहासंबंधानें आपला मनोत्साह दाखविण्याकरितां सर्व लोकांनीं या राजवधूवरांस मोठमोठ्या मेजवान्या दिल्या. त्याचप्रमाणें दूरदूरच्या सुंदर व आरामस्थल अशा उपवनांत भोजनें व करमणुकीचे अनेक प्रकार घडले. मोठमोठ्या अरण्यांतून व गिरिकंदरांतून शिकारी, मृगया व पारधी चालून लोक आनंदांत निमग्न झाले. एके दिवशीं शिकारींत असतां राजाकडे पारध्यांनीं असा शोध आणिला कीं, येथें जवळच एका गुहेंत सिंह आहे, व त्यावरून पृथ्वीराजानें त्या सिंहाचा तपास काढण्याला आपले लोक पाठविले. त्यांनीं जाऊन त्या गुहेभोंवतीं मोठा गलबा करून आंतून सिंहाला बाहेर काढण्याचा प्रयत्न केला. त्यावरून आंतून त्रासलेला व सिंहचर्म पांघरलेला असा एक मनुष्य डोळे चोळीत चोळीत बाहेर आला. तेव्हां त्यांनीं त्याजकडे बघितलें तों तो सिंह नसून दुर्वासऋषीचा शिष्य चक्षुःश्रवा आहे असें समजलें. चक्षुःश्रव्यानें रागानें अंगावरचें कातडें काढून टाकून राजाला उद्देशून ह्मटलें, 'अरे अधमा, तूं माझी तपश्चर्या भग्न केलीस. मी निरुपद्रवी तपस्वी कोणाला दुःख

न देतां ह्या एकांत गुंफेंत तपस्याचरण करीत बसलों होतों व ह्या तपस्येचें दशांश फळ तुला घरबसल्या मिळत होतें. परंतु तें तुला सहन न होऊन मला ताप देण्याकरितां तूं हे त्रासदायक लोक पाठविलेस! त्या तुला माझा असा शाप आहे कीं, तुझा शत्रु तुझे डोळे कांचेनें भोंसकून फोडील!' हा शाप पृथ्वीराजास कळतांच तो ताबडतोब त्या तपस्व्यास शरण गेला, व 'हें कर्म अजाणतां झालें आहे, याजकरितां शापविमोचन व्हावें;' अशी त्यानें विनंति केली. ऋषि ह्मणाला 'दिल्या शापाचें निवारण कांहीं होणार नाहीं. परंतु ज्या अर्थी तूं हें अजाणतां कृत्य केलेंस, त्या अर्थी मी यांत इतकीच सवड ठेवितों कीं, हा शाप आणखी बारा महिन्यांनीं तुला भोगावा लागेल. तितक्या मुदतींत तुला जें काय आपल्या जीविताचें सार्थक करून घ्यावयाचें असेल तें करून घे.'

ह्याप्रमाणें पृथ्वीराजाला शाप तर झाला व त्या शापाचें भोक्तृत्व येण्यापूर्वी त्यास एक वर्षाचा अवधि होता. इतक्या काळांत त्याला ज्या काय परोपकाराच्या, लोकसुखाच्या आणि पारत्रिक साधनांच्या गोष्टी करावयाच्या होत्या त्या करण्यास पुष्कळ अवकाश होता. 'भागवत-' प्रसिद्ध परीक्षिति राजास शाप होऊन तो सात दिवसांनींच मृत्यु पावला. परंतु तितक्या अवधींत त्याला जें कांहीं इहपरत्र सुखावह असें साधन करावयाचें होतें तेवढें त्यानें उरकून घेतलें. त्याप्रमाणें पृथ्वीराजाला तर एक वर्षाची मुदत होती व तेवढ्या मुदतींत त्यानें केलीं असतीं तर अनेक महत्कृत्यें झालीं असतीं. परंतु तें कसें व्हावें! परीक्षितीला सात दिवसांनीं मृत्यु येणार असें समजल्याबरोबर त्याची परलोकसाधनाकडे चंद्री लागून गेली. त्याला पुत्र पौत्र वगैरे संसारसुखें व राज्यसुखें जीं पाहिजे होतीं त्यांचा त्यानें उपभोग घेतला होता व यामुळें त्यास फार लौकर विरक्तता उत्पन्न झाली. पण तशी पृथ्वीराजाची गोष्ट नव्हती. याचा यौवनमद, आणि तशांत नवयौवनसंपन्न रूपवती वधू नुक्तीच परिणीत करून आणिल्यामुळें तिच्या संगें विषयसुखाच्या बहारींत त्याचें मन रमून गेलें होतें. त्यानें शापाची धास्ती फारच थोडी मनांत बाळगिली. त्याला अनुभव काय तो शौर्य आणि

शृंगार या दोन गोष्टींचाच असे. धर्म आणि वैराग्य ह्या गोष्टी काय आहेत हें त्याच्या स्वप्नींही नव्हतें. तो रतिसुख हेंच जन्माचें सार्थक असें समजत असे; व हा त्याचा समज संयोगतेशीं परिणय झाल्यापासून तर अधिकाधिक दृढ होत चालला होता. वर लिहिल्या प्रकारच्या शिकारी, मृगया आणि पारधींची कांहीं दिवस मजा मारून तो दिल्लीस परत आला आणि स्वेच्छपणें संयोगतेसहवर्तमान विषयसुखांत मग्न झाला. ह्या विषयसुखाच्या नादानें आणि लोलुपतेनें त्यानें राज्यकारभार आणि शिकारी वगैरे हीं सर्व कांहीं सोडून संयोगतासमागम आणि संयोगतासान्निध्य मात्र मनोभावेंकरून स्वीकारिलें! सर्वकाल संयोगतेचा महाल बरा कीं आपण बरा. पृथ्वीराजाला दुसऱ्या सुंदर सुंदर पत्न्या होत्या; पण चंद्रमा उगवल्याबरोबर तारागण जसा निस्तेज होतो, तद्वत् संयोगता पृथ्वीराजाची पत्नी झाल्यापासून त्याच्या इतर स्त्रियांची स्थिति झाली. अवघी रात्र संयोगतेबरोबर रंगविलास उडविण्यांत घालावी, पहांटे स्नान व शृंगार करून थोडा वेळ कचेरीच्या जागीं येऊन सामंतांचे वगैरे मुजरे घ्यावे, कीं स्वारी पुनः संयोगतेच्या महालीं दाखल. असा त्याचा क्रम पहिल्यानें कांहीं दिवस चालला होता. पण ह्या मध्यें जो थोडा वेळ कचेरीला जाई तेवढी वेळही आपल्या डोळ्यांआड राजा होऊं नये असें संयोगतेला वाटून तिनें त्याचें तें कचेरीला जाणेंही बंद केलें! ती शृंगारशास्त्रनिपुण असून तिला भर्ता मिळाला तोही परमविलासी असल्यामुळें तें युग्म रतिमन्मथांप्रमाणें सदैव आपल्याच रंगांत दंग होऊन गेलेलें असे. नृत्यसंगीतांतही संयोगता प्रवीण असल्यामुळें राजा नादलुब्ध होऊन तो इतर व्यवधानें आणि विषय सर्व विसरून संयोगतेला अर्पण झाला. चंद भाट आपल्या ग्रंथांत, पृथ्वीराज हा संयोगतेशीं किती अंशांनीं लंपट झाला तें लिहित असतां ह्मणतो कीं, 'मनुष्याची छाया जशी सर्वदा त्याचे बरोबर असते, त्याजपासून कधींही दूर होत नाहीं, तद्वत् राजा हा संयोगतेची छाया बनला!' तिच्या नादीं लागून कचेरीदरबार आणि राज्यव्यवस्था हीं त्याच्या ध्यानींमनींही येईनातशीं झालीं!

**सं**योगतेच्या सातशें दासी होत्या; त्या दासींच्या शंभर शंभर दासी ह्याप्रमाणें सात चौक्या केल्या; व त्या सात चौक्यांतून जेव्हां आंत वर्दी पोहोंचेल तेव्हां पृथ्वीराजाची भेट व्हावयाची; असा सर्वत्र स्त्रीराज्याचा कारभार चालू झाला. तेव्हां अर्थात् **सा**मंत व राजा यांचें परस्पर अदर्शनच झालें. सात चौक्यांतून राजापर्यंत निरोप जाईल, त्या निरोपाच्या वेळीं राजा तो ऐकण्यास रिकामा असेल, नंतर त्याचें परत उत्तर सात चौक्यांतून बाहेर येईल, तेव्हां काय तो खुलासा कळावयाचा; तर इतका ताप करून राजाकडे दाद मागण्यास जाण्याचें संकट कोण आणून घेणार? ह्याप्रमाणें राजाप्रजेचा संबंध तुटतच चालला. त्यांतून कोणीं राजाकडे निरोप पाठविण्याचा व दाद मागण्याचा पिच्छाच घेतला तर त्यापासून राजास त्रास होऊन त्या कामीं त्याची बरीच वेळ जाई. परंतु हेंही **सं**योगतेस न आवडून तिनें दासींच्या पहिल्या पाहऱ्यावरच सांगून ठेविलें कीं, 'इतःपर कोणाचा निरोप आला तर बाहेरच्याबाहेरच तो राहील अशी खबरदारी ठेवा.'

इकडे पृथ्वीराज नानाप्रकारचीं मद्यें, विविध रुचीचीं मांसें, कस्तूरी वगैरे सुगंधी द्रव्यें आणि इतर कामोद्दीपक पदार्थ यांच्या सेवनानें अत्यंत मत्त होऊन **सं**योगतेशीं इतका लंपट झाला कीं, त्याला सूर्य केव्हां उगवतो आणि केव्हां मावळतो ह्याचीही शुद्धि नाहींशी झाली. याचा परिणाम अर्थातच फार भयंकर दिसूं लागला. गुराख्यावांचून गुरें जशीं रानोमाळ फिरूं लागतात, तशी राजावांचून प्रजा बेबंद झाली. राज्यांत चोर, लुटारू, लुच्चे, घातुक वगैरे लोकांचें पुंडावें फार माजूं लागून, त्यांना राजभय ह्मणून अगदीं नाहींसें झालें. लष्करांतल्या व इतर लोकांस पगार वेळच्या वेळीं न मिळाल्यामुळें ते लोक बिथरून भराभर चाकऱ्या सोडून एकामागून एक निघून गेले व दुसऱ्या राजांकडे चाकऱ्या धरून राहिले. ह्याप्रमाणें चोहोंकडे अंदाधुंदी चालली, इकडे, पृथ्वीराजाचा शत्रु **शहाबुद्दीन गोरी** हा डोकावून छिन्द्रान्वेषण करीत बसलाच होता व त्यानें ही संधि बघून दिल्लीवर स्वारी केली असतां त्यास यश मिळणें संभाव्य होतें; परंतु दिल्लीचे कित्येक राजनिष्ठ गृहस्थ तसेच दम धरून अस-

त्यामुळें शहाबुद्दीनाची दिल्लीवर येण्यास छाती होईना. या राजनिष्ठ सभ्य गृहस्थांनीं एके दिवशीं एक सभा भरवून त्यामध्यें राजाला एक अर्ज पाठविण्याचें ठरविलें. परंतु तो अर्ज राजाला पोंचवावा कोणीं, आणि कसा, ही पंचाईत पडली. हें कार्य जुन्या, अनुभविक व पोक्त मनुष्यांशिवाय व्हावयाचें नाहीं व असे गृहस्थ चामुंडराय, हाहुलीराय हमीर, चंद भाट आणि रामगुरु पुरोहित हे चौघेच जिवंत होते. त्यांत चामुंडराय तर कैदेंत होता. तेव्हां चंद भाट आणि हाहुलीराय यांना हें कार्य करण्याविषयीं विनंति केली. परंतु चंदानें सांगितलें कीं, 'आपल्या ह्या अर्जापासून कांहींएक फायदा होणार नाहीं.' तरी प्रजाजन आणि सभ्यलोक यांचा अतिशय आग्रह पडल्यामुळें चंदाला तें काम अंगावर घेणें प्राप्त झालें. चंदाला माहित होतें कीं, ह्या अर्जाचा जबाव दासींच्या मार्फत येईल. ह्मणून त्यानें पहिल्यानें एक चिठ्ठी लिहून पृथ्वीराजाकडे पहिल्या चौकीवरील मुख्य दासीमार्फत पाठविली. त्या चिठ्ठींत चंदानें असें लिहिलें होतें:—

'तुं पर गोरी रत्तियं, अरु ता घर गोरी तक्कियं ।'

ह्मणजे—'तूं तर गोरी(स्त्री)बरोबर रतिसुख भोगण्यांत दंग झाला आहेस, पण तुझ्या घरांत गोरी (शहाबुद्दीन) शिरत आहे!'

ही चिठ्ठी राजाकडे जाऊन पोंचली. तेव्हां राजाची नजर चुकवून संयोगतेनें ती चिठ्ठी वाचून बघितली; व संतप्त होऊन ह्मणाली, 'आह्मी रतिसुखांत असलेलें बघवत नसणारा असा हा कामदेवाचा शत्रु कोण आहे? त्यास वेताच्या छड्यांनीं मारमारून हुसकून द्या.' हा तिचा हुकूम ऐकतांच दासी छड्या घेऊन धांवल्या. दाराशीं हाहुलीराय आणि चंद भाट हे राजाकडून काय निरोप अथवा उत्तर येतें याची वाट बघत मोठ्या उत्कंठेनें बसले होते. तों दासींचा समाज धांवत आलेला बघून त्यांस आशा वाटली कीं, कांहीं सन्मानाचें पाचारण असेल; व या आशेनें ते त्या दासींना विचारून खुलासा काढणार तों त्या त्यांचेजवळ येऊन त्यांनीं एकामागून एक दोन दोन चार चार छड्यांचें प्रहार त्यांच्या पाटीवर चालविले. ह्याप्रमाणें त्या दासींनीं धूम बडविण्याचा सपाटा चालविला. आतां त्या दोघांमध्येंही

शक्ति होती कीं, एकेकीच्या एकेक थोबाडींत लगावली असती ह्मणजे त्यांनां परलोकचीच वाट धरावी लागती. परंतु त्यांनीं असा विचार केला कीं, 'अबलांच्या अंगावर हात टाकण्यांत शौर्य नसून तसें करणें उलट क्षात्रधर्माला कलंकरूप आहे.' ह्याप्रमाणें त्या बिचाऱ्यांच्या पाठींवर छड्यांचे प्रहार चालले होतेच. तेव्हां, त्यापासून कांहीं तरी बचाव करावा ह्मणून हाहुलीरायानें तेथील देवडीचा मोठा थोरला दरवाजा उपटून आपल्या पाठीवर घेतला व याचप्रमाणें चंदानेंही केलें. तेव्हां दासींच्या छड्या त्या कवाडावर बसूं लागल्या. हा देखावा फारच चमत्कारिक आणि सखेदाश्चर्य उत्पन्न करणारा होता! आपल्या दासींना केलेल्या हुकमाप्रमाणें त्या तो अमलांत आणितात किंवा नाहीं हें बघण्याकरितां संयोगता स्वतः पृथ्वीराजासमवेत रंगमहालाच्या खिडकींत येऊन वर लिहिलेला तमाशा बघत उभी राहिली. तेव्हां पाठीवर कवाड असून वर छड्या बसत आहेत व कवाडाच्या भारानें दोघेही वांकून गेले आहेत असें त्यांस आढळून पृथ्वीराज आणि संयोगता हीं हांसायाला लागलीं. तीं दोघें आपली हेलना बघून हांसतात असें हाहुलीरायानें बघितलें, तेव्हां तर त्याचें मस्तक फिरून गेलें. त्यानें पाठीवरचें कवाड फेंकून दिलें आणि तो चंदाला ह्मणाला, 'चंदा, आतां दिल्लीमध्यें आपण राहावें हा धर्म नाहीं. राजाचा विनाशकाळ आल्यामुळें अशी विपरीत बुद्धि त्याला होत आहे. त्याला आणि संयोगतेला वाटेल तो गोंधळ घालूं द्या. संयोगतेच्या बांगड्या फुटल्याशिवाय मला चैन पडणार नाहीं. त्या मत्त स्त्रियेनें आपला फार अपमान केला.' यावर चंदानें सांगितलें कीं, 'असा अविचार आपण करूं नये. कसा झाला तरी तो आपला राजा आहे. आज तो विषयलंपट झाल्यामुळें त्याजकडून असा अविचार होतो आहे. परंतु तोच उद्यां शुद्धीवर येऊन पूर्ववत् आपल्या प्रजाजनांचें रक्षण करूं लागेल. तेव्हां देशत्यागाचें भाषण आपल्या तोंडून निघूं नये.'

**हाहुलीराय**—तुह्मांला कांहींही वाटो; मला तर त्याच्या सुधारण्याची आशा नाहीं. राजाला ही संयोगता मिळाली नाहीं तर हिंदुराज्याची मूर्तिमंत वियोगता राजाच्या गळ्यांत पडली आहे! तेव्हां, या वियोगतेपासून बरें होण्याची आशाच नको!

**चंद**—जें होणार असेल तें होईल. परंतु आपण राजाला व देशाला सोडून जाऊन आपल्याकडे बदनामी घेऊं नये. पुढें ज्या कांहीं लढाया होतील त्यांत आपण शौर्य गाजवून आपल्या राजाचें राज्य रक्षण करूं व त्यांत आपली कीर्ति होईल.

**हाहुलीराय**— पुढें ज्या लढाया होतील त्यामध्यें शौर्य गाजवूं व आजपर्यंत गाजविलें आहे. परंतु त्याचा उपयोग काय ? राजा आपला निष्काळजी होऊन, उलट आमची कर्तबगारी न समजतां उन्मत्तपणानें आमचा उपहास करितो, तेव्हां अशा राजाचे आश्रयाखालीं तुकडेखाऊ ह्मणून अपकीर्तीनें राहणें मला तर बिलकुल प्रशस्त वाटत नाहीं. राजाला तर असा अहंभाव झाला आहे कीं, सर्व राज्य काय तें माझ्याच बाहुबलानें चाललें आहे. तेव्हां त्याचे डोळे उघडले पाहिजेत.

**चंद**—जें होईल तें होवो बोवा; पण मी तर या कामांत तुह्माला आपली संमति देत नाहीं.

**हाहुलीराय**—तुह्मी लोक तर जाणूनबुजूनच **भाट**भाई आहांत. तुमच्या जिव्हेंत मात्र शौर्य आहे, परंतु अंगीं कांहीं पराक्रम नाहीं. तेव्हां, अशा अनुपकारी व कृतघ्न राजाच्या आश्रयास राहून तुकडा खावयाचा तर तो तूं खुशाल येथें राहून खा. माझा तर कृतसंकल्प होऊन चुकला आहे कीं, **संयोगतेचे** चुडे उतरल्याखेरीज **दिल्ली**मध्यें पाणी ह्मणून प्यावयाचें नाहीं !

**हाहुलीरायानें** असें ह्मणून, तो आपल्या घोड्यावर स्वार झाला आणि **गिझनी**कडे त्यानें आपला घोडा फेकला[१].

---

१. पूर्वीपासून या देशांत स्वदेशाभिमान जसा जागृत असावा तसा असलेला दिसत नाहीं. आपल्या राजाचें आणि आपलें जरा वांकडें पडलें कीं परकीय राजाकडे जाऊन त्याची मदत घ्यावयाची आणि स्वराज्याचा नाश करावयाचा हें व्रत एतद्देशीयांस जणूं काय बाळकडूच होऊन गेलें आहे असें दिसतें. दुष्ट राजा झाला तर त्याला लोकांनीं आपसांत एक विचारानें आवरावें हें तत्व कोणास माहितच नाहीं; व राजकीय ज्ञानाचा अभाव असल्यामुळें, ज्याची आपण मदत घेतों तो जबरदस्त असला तर तोच आपला सर्व मुलूख

झालें; ह्याप्रमाणें हाहुलीराय दिल्लींतून निघून गेला, तरी त्याची खबर पृथ्वीराजास नाहीं. हाहुलीराय निघून गेल्यावर दिल्लीच्या लोकांस काळजी पडली कीं, 'त्यानें जी प्रतिज्ञा केली आहे ती तो सत्य करील; आणि तसें झालें ह्मणजे दिल्लीचें राज्य बुडेल.' पण एकाची देखील माय व्याली नव्हती कीं, ही सर्व हकीकत राजाकडे कोणी जाऊन सांगेल. सांगेल कोण? आणि सांगावयाला जातो कसा? राजाला राज्याची शुद्धि आणि बुद्धि असेल तर ना? राज्यांतलीं चांगलीं चांगलीं, राज्याचें हित करणारीं, आणि अभिमानी अशीं माणसें सर्व संयोगताप्राप्त्यर्थ कनौजप्रसंगांत ठिकठिकाणीं पडलीं; व बाकी जीं कोणी जुनीं खोडें होतीं त्यांनीं, आतां दिल्लीची होणारी दुर्दशा आपल्या डोळ्यांनीं आपण न बघितली तर बरी असा विचार करून वानप्रस्थाश्रम स्वीकारिला होता. पैसेवाले होते ते आपआपली पुंजी, राज्यांतल्या अव्यवस्थेला आणि पुंडाव्यांला त्रासून, जमिनीआड करूं लागले. ज्यांच्या घरीं सुंदर स्त्रिया होत्या ते आपली अब्रू रक्षण करण्याकरितां निर्भय व सुरक्षतेचीं ठिकाणें शोधण्यास दिल्ली सोडून चालते झाले. आणि कित्येक धर्मभोळे लोक होते ते, दिल्लीच्या राज्याची तर अशी दुर्दशा उडाली आहे, पण अशा समयीं परशत्रु येऊन दिल्लीवर न पडोत व कदाचित् म्लेच्छादि शत्रु यावयास निघालेच असतील तर त्यांजवर संकटें गुदरून त्यांचा मार्गांतल्यामार्गांतच नाश होवो, अशाविषयीं आपआपल्या आराध्य देवदेवतांची उपासना करूं लागले. इत्यादि प्रकारें ज्यांस जो उपाय सुचेल तो ते करूं लागले. ह्याप्रमाणें दिल्लीवर मोठें संकट प्राप्त झालें!

हाहुलीराय जो दिल्लीहून निघाला तो गिझनीस जाऊन पोहोंचला व त्यानें शहाबुद्दीनाला सलाम करून अर्ज केला कीं, 'आपल्याला दिल्लीचें राज्य पाहिजे असल्यास तें मी आपल्याला अत्तां देतों.'

---

बळकावून बसेल ह्याचेंही त्यांस धोरण रहात नाहीं. ह्याप्रमाणें जे स्वराज्याचे विरुद्ध उठतात त्यांची फजिती होते. अशीं उदाहरणें शेंकडों आहेत. सारांश, देशाभिमान लोकांमध्यें उत्पन्न होण्याचें बीज आमच्या हिंदुस्थानांत कोणाच्याच वांट्यास आलें नाहीं हें या देशाचें दुर्भाग्य होय!

पण **शहाबुद्दीनानें** **हाहुलीरायाचें** हें भाषण ऐकून असा विचार केला कीं, 'कसा तरी हा शत्रूकडील फितूर झालेला मनुष्य, तेव्हां याजवर विश्वास तरी किती ठेवावा ?' ह्याप्रमाणें **शहाबुद्दीन** विचारांत पडलेला बघून **हाहुलीरायानें** त्यास पुनः ह्मटलें, 'जहांपन्हा, आपल्याला विचारांत पडण्याचें कारण नाहीं. **दिल्लीची** राजनीति आणि व्यवस्था खरोखर इतकी बिघडली आहे व तेथील लोक राजाला इतके त्रासले आहेत कीं, आपण गेल्याबरोबर सर्व **दिल्लीशहर** आपण होऊन आपल्या स्वाधीन होईल. आपण जाण्याचा मात्र अवकाश. आणि असें होण्यास राजाचें वर्तनच तसें झालें आहे. राज्यांतल्या कर्तबगार माणसांची वाताहत झाली; **कयमाषप्रधानाला** राजानें आपल्या हातें मारिलें; **चामुंडरायाच्या** हातांत बेडी घातली आहे व त्यामुळें त्यानें पुनः शस्त्रधारण करणार नाहीं ह्मणून प्रतिज्ञा केली आहे; **संजमराय महोबाच्या** लढाईंत पडला; आणि **कन्ह**, **लंगडीराय**, **चंद पुंडीर**, **जाम यादव**, **गोविंदराय**, **आतताई** वगैरे शूर शूर व राज्यस्तंभ ह्मणविलेले अभिमानी पुरुष **कनौजच्या** लढाईंत पडले. बाकी एक मी, दुसरा **चंद भाट** आणि तिसरा **रामगुरु पुरोहित** असे तिघेजण राहिलों आहोंत. पण मी तर आपलेकडे निघून आलों व राहिले दोघे; ते तर एक **भाट** आणि दुसरा **भट** (**ब्राह्मण**). त्यांच्यानें काय होणार आहे ? तर जलदी करा.' इतकें सांगितलें तरी, **शहाबुद्दीनाला** पूर्वी **पृथ्वीराजाकडून** चटका बसला होता ह्मणून त्याच्यानें **हाहुलीरायाच्या** सांगण्यावर विश्वास ठेववेना; व याकरितां त्यानें आपला एक विश्वासाचा जासूद **दिल्लीची** खरी स्थिति बघून येण्यास पाठविला. नंतर त्यानें येऊन, **हाहुलीराय** सांगतो तीच गोष्ट खरी अशी खात्री केल्यावर, तीस हजार लष्कर घेऊन **शहाबुद्दीन** **दिल्लीवर** जाण्यास निघाला.

पण ही खबर राजास कोठची कळायला ? तो विषयांध व स्त्रीलंपट होऊन त्याला दिवसरात्रीचेंही भान राहिलें नव्हतें. **दिल्लीच्या** राज्याची फार अव्यवस्था झाली आहे; **हाहुलीराय** प्रतिज्ञा करून **शहाबुद्दीनाकडे** जाऊन मिळाला आहे; व **दिल्लीमध्यें** फौजफांट्याचा बंदोबस्त आणि शस्त्रास्त्रांची सामग्री बिलकुल नसून, या एकाही गो-

ष्टीची पृथ्वीराजास शुद्धि नाहीं आणि शहाबुद्दीन तर दिल्लीवर येण्यास निघाला; हें वर्तमान चितोडचा समरसिंह रावळ यास कळून तो पृथ्वीराजाचें बोलावणें येण्याची वाट न बघतां तेरा हजार फौज घेऊन शहाबुद्दीनास आडविण्याकरितां दिल्लीस निघून आला. तरी, हें वर्तमान पृथ्वीराजास कळवून त्याला ह्या संकटनिवारणार्थ दोन घटका तरी संयोगतेपासून एकीकडे काढण्याची कोणास छाती नव्हती. असा कोणाचा जीव वर आला होता कीं, राजाकडे असलीं महत्त्वाचीं वर्तमानें तरी अगत्यपूर्वक जाऊन कळवावीं, आणि प्रसंगीं दासींच्या हातच्या छड्यांनीं पाठ बडवून घ्यावी? सारांश, हीं जीं महत्संकटाचीं आणि अनर्थापाताचीं कृत्यें पुढें होण्याचा रंग दिसत होता त्याची पृथ्वीराजाला गंधवार्ताही नव्हती. तेव्हां, समरसिंह मित्रत्वानें आपली फौज घेऊन आपल्यास साह्याला आल्याची बातमी तरी त्याला कोठून कळावी? समरसिंह जो राजाचे साह्यार्थ ह्मणून आला तो शहराबाहेर तंबू ठोकून त्यामध्यें राहिला. त्याला या बसा, ह्मणायला होतें कोण?

समरसिंह[१] रावळाचें, हा इतिहास लिहिणाऱ्या चंद भाटानें आपल्या पुस्तकाच्या 'महायुद्ध' नांवाच्या एका अध्यायांत मोठें सुरस वर्णन केलें आहे. तो सुशील असून त्याची चालचलणूक प्रशंसनीय व अनुकरणीय असे. तो सैन्यव्यवस्थेंत मोठा निपुण असून युद्धांत त्याची अर्जुनासारखी प्रसिद्धि असे. त्याचप्रमाणें तो शांत, गंभीर, दूरदृष्टि, वक्ता, सदसद्विचारी आणि मित्राभिमानी असा असे. तो आपल्या सरदारांस फार आवडता असून चव्हाणकुलाला सन्माननीय झाला होता. तो नीतिमान्, राज्यकार्यविशारद आणि शौर्यवान् असल्यामुळें तो आपल्या प्रजाजनांस पितृवत् होता. चितोड येथील राजवंशास हा एक भूषणभूत होऊन गेला.

समरसिंहानें वर लिहिल्याप्रमाणें शहराबाहेर तंबू ठोकून तळ दिला. परंतु त्याची विचारपूस कोणींच केली नाहीं. ह्याप्रमाणें त्यानें आठ दिवसपर्यंत वाट बघून शेवटीं पृथ्वीराजाला एक चिठ्ठी पाठविण्याचा निश्चय केला. त्यानें एक चिठ्ठी लिहून ती आपल्या शिकविलेल्या पो-

---

१. समरसिंहास चंदानें 'खोमान' असेंही कोठें कोठें ह्मटलेलें आढळतें.

पटाचे चोंचींत दिली आणि त्यास सांगितलें कीं, 'पृथ्वीराजाचे जनानखान्यांत जाऊन तेथें तो खेळत रमत बसला असेल अशा वेळेस नेऊन दे.' त्याप्रमाणें पोपट चिठ्ठी घेऊन गेला. तों राजा संयोगतेसहवर्तमान एका गुलाबपाण्याच्या हौदांत क्रीडा करीत होता असें त्यानें पाहिलें. नंतर कांहीं वेळानें संयोगता हौदाचे बाहेर निघून वस्त्रपरिधान करूं लागली व मागून एकटाच राजा बाहेर निघाला; तेव्हां पोपटानें त्याचेपुढें हळूच ती चिठ्ठी टाकिली. राजानें तिजवरील मोहोर फाडून पाहिलें तों आंतमध्यें कांहीं मजकूर लिहिलेला आढळला तो तो कागद वाचीत असतां संयोगतेची त्याजकडे नजर जाऊन तिला वाटलें कीं, 'कोणी तरी दुष्टानें हा आमच्या प्रीतींत व्याक्षेप आणण्याकरितां गुप्तपणें प्रयत्न केला असावा. एरवीं येथें चिठ्ठा पट्टा यावा कसा?' इतक्यांत राजानें तें सर्व पत्र वाचून टाकिलें. तेव्हां त्यास सर्व उजेड झाला व तो क्षणभर स्तब्ध झाला. संयोगतेनें ही त्याची स्थिति बघून ह्मटलें कीं, 'कोणा पापी चांडाळानें माझ्या प्राणप्रियाचें मन भ्रांत करण्याकरितां हें जादूच्या मंत्रांनीं भारलेलें पत्र येथें आणून टाकिलें?' व ती मोठ्यानें ह्मणाली, 'सख्या, सख्या, तें पत्र आपण वाचूं नका. तें आपणास भ्रमिष्ट करून टाकील! हीं जादूटोण्याचीं पत्रें अशींच असतात!' राजानें तिच्या बोलण्याकडे लक्ष न देतां मोठ्यानें ह्मटलें, 'काय! माझ्या शहरांत माझा हितेच्छु मित्र समरसिंह रावळ आठ दिवस येऊन राहिला असतां त्याची मला वार्ताही नाहीं? धिक्कार असो मला व माझ्या विषयांधपटुत्वास!' राजाचे हे शब्द व सखेद मुद्रा पाहून संयोगतेनें तर्क केला कीं, ह्या वेळीं राजाचें मन खरोखरच त्या पत्रांतील मजकुरानें व्यग्र झालें आहे. तेव्हां या वेळेस त्याचें समाधान करण्यासारखेंच बोललें पाहिजे. ही विनोदाची अथवा शृंगाराची वेळ नव्हे. ती ह्मणाली, 'प्राणनाथ, इतकें खिन्न होण्याचें कारण काय? या चिठ्ठीमध्यें कांहीं वाईटसाईट बातमीबितमी तर लिहिलेली नाहीं ना?'

**पृथ्वीराज**—नाहीं प्राणसखे, तसें कांहीं नाहीं. पण माझा दोस्त व सखा समरसिंह रावळ हा येथें आठ दिवसांपासून येऊन बसला असून त्याची मला कोणीं मुळींच खबरही दिली नाहीं!

**संयोगता**—ओहोहो! मग ही तर किती आनंदाची बातमी कीं, आपले दोस्त व सखे जे **स**मरसिंह **रा**वळ ते आपल्या घरीं पाहुणे आले आहेत! ही तर दुग्धवृष्टिच झाली! तेव्हां आपण आतां जलदी करून त्यांच्या सत्कारास लागावें व या कामांत मी आपल्याला मदत करून या पाहुण्यांची उत्कृष्ट सरबराई ठेवतें; आणि ज्या माझ्या गुलाम दासींनीं, ही खबर त्यांस कळविली असून आपल्याला कळविली नाहीं, त्यांस स्वतः चांगली जबर शिक्षा देतें.

नंतर **पृ**थ्वीराजानें त्वरित राजवाड्यांत येऊन सर्व दरबारी मंडळीस बोलावण्याच्या खुणेचा डंका वाजविला व सर्व मंडळी जमल्यावर मोठ्या समारंभाची स्वारी काढून शहराबाहेर जेथें **स**मरसिंह उतरला होता तेथें त्यास सामोरा जावयाला निघाला. हा सर्व महोत्सव वस्तुतः राजानें आपला मित्र **दि**ल्लीस आला ह्मणून केला व त्या संबंधाचा आनंद प्रजेपेक्षां राजासच विशेष होता. परंतु या वेळीं, जो आपला धनी व राजा बाराबारा महिन्यांत दृष्टीस पडेनासा झाला होता व ज्याचें दर्शन दुर्लभ झालें होतें तो ह्या प्रकारच्या आनंदोत्सवार्थ बाहेर पडला, हें पाहून सर्व प्रजाजनांनींही आत्मसंतोषानें आपापल्या घरीं आनंददर्शक असे थाटमाट आणि रोषनाई केली. यामुळें तर **दि**ल्लीशहरास विशेष शोभा येऊन राजा व प्रजा यांनीं एकंदर पाहुण्यांचा मोठा मान राखिला असें सहज दृष्टोत्पत्तीस आलें. राजानें **स**मरसिंहाला सत्कारपूर्वक बोलावून आणून मोठा दरबार भरविला. व त्या वेळीं राजा व **स**मरसिंह यांस दरबारांत बरोबरीनें बसलेले बघून सर्व रयत मोठी संतुष्ट झाली. या संतोषदर्शनार्थ मोठमोठ्या सुस्वर वाद्यांचे गजर चालून नौबदी चौघडे यांच्या नादांनीं सर्व राजवाडा आणि भोंवतालचा प्रदेश दुमदुमून गेला होता.

ह्याप्रमाणें महोत्सवाचा जल्लोष चालून वाद्यांच्या गजरांत एकमेकांचा शब्दही एकमेकांस ऐकूं येईनासा झाला, इतक्यांत असा चमत्कार झाला कीं, राजवाड्यांतील चौकाची मधली शिळा दुभंग होऊन आंतून **स**दाशिवाचा गण जो **वी**रभद्र तो एकदम बाहेर पडला. **चं**दानें या प्रसंगाचें जें वर्णन केलें आहे तें असें:—

"रंग राग बागन थट्टयं, घन घोर सोर प्रगट्टयं ।
मुनि अलख वीर स जग्गयं, सिर पलट ऊंधिम पग्गयं ॥
लंबी असीं गज सज्जयं, पच्चास चौडिय गज्जयं ।
दस गज सुदल परमानयं, तिही गुफा खुल्ली अमानयं ॥
रुद्राक्षमुद्रा धारयं, मुख शंभुशंभु उचारयं ।
कर खडग खप्पर राखयं, मुख शंभशंभु भाखयं ॥
पृथिराज कीन प्रणामयं, बोल्यो न वीर स तामयं ।
तहां देव रावल समरसी, छंड्यो न आसन रघुवंसी ॥
पूछंत चंद सु बत्तियं, कहो होनहार स कथ्थियं ।
यह होनहार स होय हे, दिल्ली न थिरता सोय हे ॥
पुन म्लेच्छ दलबल जोर हे, अर शहर दिल्लीय तोरहे ।
पृथिराज जुद्ध न जीतहे, रण समय रावळ वीतहे ॥
चामुंडराय गुरु रामही, कट परही भारथ कामही ।
पृथिराज बंधही पावही, खट मास विपत विहावही ॥
नृपशाह चंद रुतीनयं, रहे एक ठोर सुलीनयं ।
गोरी सु दिल्ली आनयं, पुनि बरत हिंदुसथानयं ॥
तिहि दुर्ग देवल भाजयं, अति आनरथ्य स साजयं ।
वरते स वरसां दोयसें, ता पीछ चकता आवसे ॥
हिंदवान दंड भरावही, नृप घर घरही धिय ब्यावही ।
दखनाद सुं दल आवही, तिहि तखत दिल्ली न पावही ॥
ता पीछ टोपी आवही, बहु इलम कलम चलावही ।
नारी सु राजा बज्जसी, हिंदु तुरक सब भज्जसी ॥
इह तखत दिल्लीय आवही, नृप घर घरही सुख पावही ।
वह धर्मराज जमावही, प्रतिपाल न्याय कहावही ॥
जब न्यायबंधन छूटशी, तब आब पेटा फूटशी ।
मिलि बलक काबुल थट्टयं, तीजो स भूपत भट्टियं ॥
विद्धंश दिल्ली याटयं, रहि वरस खट परनाटयं ।
सीसोद दिल्ली आवही, शिर राण छत्र धरावही ॥
पेंतीस वर्ष प्रमानही, भोगवे हिंदुसथानही ।
अजमेर पीर स जग्गही, पुनि तखत दिल्लिय मंगही ॥
तुंवर स दिल्लिय घेरही, पुनि आण दिल्लिय फेरही ।
राठोड दिल्ली आवही, फिर धर्मनीत चलावही ॥"

भावार्थ—"ही जी शिळा तडकून निखळली ती ऐशीं हात लांब, पंचवीस हात रुंद आणि दहा हात जाड होती. ह्या शिळेखालीं एक गुंफा होती; तींतून रुद्राक्षमाला धारण केलेला आणि हातांत खड्ग व नरकपाल अशा वेषानें 'शंभु शंभु' नांवाचा उच्चार करीत वीर-भद्र बाहेर निघाला. पृथ्वीराजानें ती भयंकर मूर्ति बघून त्याला प्र-णाम केला; पण तो त्याशीं कांहींएक बोलला नाहीं. नंतर सदाशि-वाचा भक्त किंवा अवतारच जो समरसिंह रावळ तो पुढें होऊन त्यानें त्याला नमन केलें. चंदानें वीरभद्राला विचारिलें कीं, 'भवि-तव्य गोष्टी काय आहेत त्या महाराजांना कळवाव्या.' तेव्हां तो जम-लेल्या जनसमूहापुढें आविर्भूत होऊन ह्मणालाः—'मी दक्ष प्रजापतीचा यज्ञ विध्वंसित करून जनक सदाशिव महाराज यांचा कोप शांत केल्या-नंतर त्यांच्या अनुज्ञेनें या ठिकाणीं स्वस्थपणें विश्रांति घेण्याकरितां येऊन राहिलों असून मला गाढ निद्रा लागली होती. परंतु तुमच्या आजच्या विलक्षण गडबडीनें आणि कलकलाटानें माझा निद्राभंग होऊन मला ताप झाला. माझ्या विश्रांतिसुखाला जो आड येईल त्याचे सर्वस्वाचा नाश होईल असें तात सदाशिवाचें मला वरदान आहे; त्याप्रमाणें आतां तुमचें सर्वस्व नष्ट होईल! यापुढें म्लेच्छ लोक प्रबल होऊन ते दिल्ली शहर जिंकितील व पृथ्वीराजाचा पराजय होईल. ह्या प्रसंगीं समरसिंह रावळ पुष्कळ उपयोगीं पडेल. चामुंडराय व रामगुरु हे युद्धांत कापले जातील. पृथ्वीराज पराभूत होऊन सहा महिनेपर्यंत दुःख भोगीत बंदिवान होऊन राहील. शहाबुद्दीन गोरी हा प्रबल होऊन हिंदु-स्थानांत फार धामधूम करील व हिंदुराजांचे किल्ले व हिंदूंचीं देवळें वगैरे मोडून छिन्नभिन्न करील. त्याप्रमाणें एक वर्षपर्यंत मोठा अनर्थ चालेल. त्यानंतर मोंगलाची स्वारी हिंदुस्थानावर उतरून तोही फार गडबड करील. तो राजे लोकांच्या घरोघर शिरून त्यांच्या मुली हिरावून त्यांजबरोबर लग्नें करील. त्यावर दक्षिणेकडून कांहीं सैन्य त्याचा पराभव करण्यास येईल, परंतु त्याच्यानें तादृश बंदोबस्त व्हा-वयाचा नाहीं. नंतर टोपीवाला येईल. तो मोठा कुशल व वस्ताद असेल. त्याची राज्यकर्त्री राणी असून तो सर्व हिंदुमुसलमानांना पादाक्रांत करील. तो दिल्लीच्या तख्तावर आपली स्थापना करून

राज्याभिषेक करील व त्याच्या राज्यकर्तृत्वानें सर्वांस सुखप्राप्ति होईल. तो धर्मांप्रमाणें राज्य करून प्रजेचा प्रतिपाळ न्यायानें करील. परंतु पुढें जेव्हां त्याच्या न्यायनीतीचा निर्बंध सुटेल तेव्हां **टो**पीवालाही खालावून **का**बूल व **ब**ल्ख येथील लोक आणि एक **भ**ट्टीराजा असे एकत्र होऊन **दि**ल्ली काबीज करतील. त्याचा **दि**ल्लीवर सहा वर्षें अंमल राहील. पुढें **उ**देपूरचे **सि**सोदिया वंशाचे राजे होतील. ते पस्तीस वर्षेंपर्यंत राजछत्राचा उपभोग घेतील. त्यानंतर **अ**जमीरचा **पी**र उठेल; व त्यावर **तु**वर आणि **तु**वरानंतर **रा**ठोड ह्या वंशांचे राजे होऊन ते धर्मनीति स्थापन करतील[1]."

**वी**रभद्राची ही भविष्यवाणी ऐकून **पृ**थ्वीराजाला वाईट वाटलें व तो भावी स्थिति ऐकून शोकाकुल झाला. तें पाहून **वी**रभद्र त्यास ह्मणाला, 'राजा, कोणत्याही गोष्टीचा शोक करूं नकोस. ही पृथ्वी कोणाच्याही हातीं सतत ह्मणून राहिली नाहीं. कित्येक वेळां ह्या **पृ**थ्वीचे अधिकाऱ्यांमध्यें फेरबदल झाले आहेत. राजा **वे**न होऊन गेला, **वि**श्वंभर झाला, **सु**रराज झाला, **हि**रण्याक्ष होऊन गेला, परंतु या धरित्रीचें आधिपत्य कोणाकडे राहिलें आहे? महान् याज्ञिक असा **ब**लिराजा होऊन गेला; पण **वा**मनानें त्याला पाताळीं घातलें.

---

१. हीं भविष्यें पृथ्वीराजाचा इतिहास लिहिल्यानंतर मागाहून कोणीं तरी घातलीं असावीं अथवा खुद्द चंद कवीनेंच कल्पनेनें हीं भविष्यें आपल्या ग्रंथांत लिहून ठेविलीं असतील. याशिवाय दुसरी कल्पना कांहीं चालत नाहीं. कवींनीं अशा कल्पना चालवून आपल्या ग्रंथांत अपूर्वाई अथवा अद्भुतता आणण्याचा पूर्वसंप्रदाय असल्याविषयीं, येथपर्यंत ठिकठिकाणीं आलेल्या वर्णनांचे दाखल्यांवरून समजत आहेच. अथवा चंदाच्या नांवावर मागाहून कोणीं कवीनें हीं कल्पित भविष्यें लाटून दिलीं असतील असेंही अनुमान होतें. मोठ्यांच्या नांवांवर भलभलते ग्रंथ, पुराणें, कथा, माहात्म्यें वगैरे रचून प्रसिद्ध करण्याची रीति आमच्या इकडे प्राचीनकाळापासून चालत आली आहे, हें कोणास अश्रुत नसेलच! 'धरणीशेषसंवादे,' 'अग्निरुवाच,' 'नंदिकेश्वर उवाच' इत्यादि उदाहरणें याच मासल्याचीं आहेत.

त्याचप्रमाणें **मांधाता** व **जालंधर हे** राजे पृथ्वीपति होऊन गेले. पण त्यांची दशा काय झाली? **पृथुराज** ह्मणून **शिवाचा** अवतारी राजा झाला; **परशुराम** हा अवतारी असून त्यानें एकवीस वेळां निःक्षत्रिय पृथ्वी केली व **ब्राह्मणांचें** राज्य स्थापिलें; **शिवभक्त**, महापराक्रमी व **लंकापति** असा **रावण** होऊन गेला; त्यामागून त्रैलोक्याधिपति **रामचंद्र अयोध्येस** राज्य करून निजधामास गेले; **दुर्योधन** येवढा बलवान् व योद्धा होता, पण **अर्जुनासमवेत** लढून अठरा अक्षौहिणी सैन्यासहवर्तमान मृत्यु पावला. सारांश, रणक्षेत्रांत जे योद्धे लढतात त्यांस प्रसंगीं यश व वैभव मिळतें व कधीं मुळींच कांहींएक न मिळतां मरावें लागतें. तेव्हां हें सर्व ऐश्वर्य, सत्ता आणि वैभव हीं व्यर्थ असून कीर्ति मात्र एक अजरामर आहे.[1]' असें बोलून **वीरभद्र** जेथून निघाला तेथेंच पुनः बसला व जी शिला दुभंग झाली होती ती त्यानें आपल्यावर ओढून घेतली आणि तो अंतर्धान पावला. तेव्हां पुनः पहिल्याप्रमाणें ती जमीन साफ झाली.

**शहाबुद्दिनानें पृथ्वीराजावर** चाल केली, त्याचे पूर्वी **पृथ्वीराजास** तत्संबंधानें कांहीं दुष्ट स्वप्नें पडलीं होतीं व तीं स्वप्नें त्यानें राणी **संयोगता** इच्याजवळ सांगितलीं होतीं असें **चंद भाट** लिहितो. त्यांतील एक स्वप्न असें होतें ह्मणून त्यानें **संयोगतेजवळ** सांगितलें कीं, "जशी काय एक गोरी आणि खुबसुरत अशी रंभातुल्य स्त्री मजजवळ आली आणि तिनें एकदम माझा हात पकडला. नंतर ती स्त्री तुजकडे आली. तेव्हां तुझी तिची कांहीं बोलाचाली होते आहे, तों एक जबरा व मदोन्मत्त असा राक्षसतुल्य हत्ती मजवर चालून आला. पुढें तो हत्ती आणि ती रंभा हीं दोघेंही नाहींशीं झालीं. पण ह्यामुळें माझी छाती भीतिग्रस्त होऊन माझ्या तोंडांतून 'हर हर!' असा शब्द निघाला. तेव्हां या स्वप्नाचा फलितार्थ काय असेल तो ईश्वरास माहित!"

हें स्वप्न **संयोगतेनें** ऐकून राजाचा निरुत्साह आणि भीति घालवि-

---

१. कधीं कधीं होणाऱ्या गोष्टीस उपाय नाहींसारखा होतो असें राज्यकारणांत व संसारांत अनेकांना हमेषा अनुभवास येतें. तरी तेवढ्याकरितां मनुष्यांनीं निरुपाय समजून निराश होऊन बसूं नये हा त्याचा इत्यर्थ.

ण्याकरितां ती ह्मणाली, 'माझे प्रियभ्रतार, आपला जयजयकार असो! व असलीं दुःस्वप्नें सुस्वप्नें होवोत! हे चव्हाणकुलमुकुटमणे, आपल्याप्रमाणें आजपर्यंत कीर्ति आणि सुख यांचा अनुभव व स्वाद कोणीं घेतला आहे? मरणें हें माणसांलाच काय पण देवादिकांच्या सुद्धां नशीबीं लिहिलें आहे. जीर्ण वस्त्र जसें फेंकून द्यावयाचें तद्वत् हा जीर्ण देह आत्मा सोडून दुसरी कुडी बघतो. यांत कांहीं मोठें आश्चर्य नाहीं. मृत्यु हा सर्वांस लागलाच आहे; पण मरण्यामरण्यांत अंतर आहे. कीर्ति मिळवून मेलें असतां तो मनुष्य अमरच आहे असें समजतात. तर आतां आपण शृंगारविषयजन्य विचार सोडून, जेणेंकरून आपलें नांव अमर राहील अशा विचारांकडे लक्ष दिलें पाहिजे. आपल्या तरवारीला यश मिळून शत्रूंना शासन करा. कांहीं चिंता नाहीं, आपला यांतच शेवट झाला तरी मी स्वर्लोकीं देखील आपली अर्धांगी होऊन राहीन!'

राजानें वरील दुष्ट स्वप्न आपल्या पुरोहितालाही सांगून, तच्छांत्यर्थ पुरोहितानें अनेक अनुष्ठानें बसविलीं व जपजाप्य वगैरे अरिष्टनिवारणार्थ उपाय चालविले. एक मंत्र लिहून तो पृथ्वीराजाचे पागोट्यांत खोंवून दिला. तशाच दुधाच्या एक हजार पितळेच्या घागरी गंगेंत सूर्यचंद्रांचे[१] तृप्त्यर्थ ओतिल्या व दशदिक्पालांचे तुष्टयर्थ दहा टोणगे बळी दिले. परंतु भवितव्य गोष्टी ज्या व्हावयाच्या त्या अशा बलिदानांनीं आणि दुग्धघटांनीं टळतात काय? अशा करण्यानें जर भालपट्टचें लिखित मिथ्या होईल तर नल आणि पांडव[२] यांस वनवास काय ह्मणून भोगावा लागता? असें चंद लिहितो.

---

१. साधारण अडाणी लोकांप्रमाणें अशा प्रकारच्या गैरसमजुती आणि भोळेपणा क्षत्रियांमध्यें फार होता व त्यामुळें त्यांचा फार नाश झाला. ईश्वरावर भरंवसा ठेवून सधीरतेनें उद्योग करावा हा मार्ग सोडून कधीं कधीं ते कपाळावर हात मारून आमचें नशीब फिरलें ह्मणून निरुत्साह होऊन बसत हें चांगलें नव्हे. यांतच शौर्य व धैर्य खचून ते पराक्रमहीन झाले.

२. याच अर्थाची संस्कृतांतही एक उक्ति आहे:—

'अवश्यं भाविभावानां प्रतिकारो भवेद्यदि ।
प्रतिकर्तुं न किं नूनं नलरामयुधिष्ठिराः ॥'

अस्तु. होतां होतां गिझनीच्या सुलतानाशीं सामना करण्याची तयारी चालली. चांगले चांगले शूर व पराक्रमी लोकांच्या लष्करावर योग्य स्थलीं नेमणुका करून 'आणखी काय काय व्यवस्था करावी?' ह्मणून पृथ्वीराजानें आपली प्रिय पत्नी संयोगता इचा अभिप्राय विचारिला. त्यावर तिचा जो जबाब मिळाला त्यांतील पहिला भाग ध्यानांत धरण्यासारखा आहे. ती ह्मणाली, 'स्त्रीची सल्ला कोण विचारतो? दुनियेंत असें समजतात कीं, कोणत्याही गोष्टींत स्त्रीचा अभिप्राय घेणें ह्मणजे एखाद्या ओनाम्याच्या बुद्धीनें चालणें होय. कारण, त्या बुद्धिहीन आहेत असा सर्वांचा दृढ ग्रह होऊन बसला आहे. मग त्या बिचाऱ्या खरोखर योग्य मसलतगार असल्या तरी त्यांची अशी पायमल्ली करून त्यांच्या मताकडे कोणी लक्ष देत नाहीं. पण, सर्वांनीं हें लक्षांत बाळगिलें पाहिजे कीं, अखिल जगांत स्त्रीवांचून काय चालणार आहे तें बघूं या. आतां आमच्यामध्यें दुर्गुण किंवा अज्ञान नाहीं असें नाहीं. आमच्यांत सदसद्गुण व ज्ञानाज्ञान हीं आहेत. परंतु स्त्रियांस सर्वांशीं मंत्रसाह्यांत अयोग्य समजतात हें फार वाईट आहे. स्त्रियांच्या सदसद्गुणांचा कोणासच पार लागला नसून, त्यांजबद्दल एकंदर जें भ्रष्ट मत प्रसृत झालें आहे तें अगदीं अयोग्य आहे. या जगांत स्त्री हें सुंदर सरोवर असून त्यावर विहार करणारे व त्याची शोभा असे पुरुषरूप हंस आहेत. तेव्हां परस्परांची परस्परांस शोभा व गरज आहे.' वगैरे.

मुसलमानांशीं लढाई देण्यास पृथ्वीराजाची फौज तयार झाली, व पृथ्वीराजही संग्रामाचा वेष धारण करून संयोगतेची शेवटली भेट घेण्याकरितां तिच्या महालांत गेला. महालांत गेल्यावर संयोगतेच्या हातानें तो आपल्या अंगावर कवच चढवीत होता व हत्यारें वगैरे जेथच्यातेथें बांधवीत होता. पण उपयोग काय? प्रत्यक्ष संग्रामांत आपल्या देहाचा बलि देण्याकरितां प्रिय भर्ता तयारी करीत असतां त्या तयारीला त्याच्या सुंदर व तरुण स्त्रीच्यानें काय हात लावणार आहे? चंद ह्मणतो, 'संयोगतेनें पृथ्वीराजास कवच घालण्याचें स्वीकारिलें. परंतु त्या समयीं तिच्यापुढें भावी अरिष्टें सर्व उभीं राहून तिचे नेत्र अश्रूंनीं अगदीं भरून येऊन तिला तें चिलखत अडकवि-

ण्याची कडीच सांपडेना! क्षुधिताच्या पुढें सोन्याचा तुकडा नेऊन ठेविला असतां त्याची जी स्थिति होते तद्वत् संयोगतेचे डोळे चव्हाणराजाचे तोंडाकडे बघत निश्चल राहिले!' इतक्यांत संग्रामवाद्यें वाजूं लागून सर्व फौजेनें सिद्ध होण्याची नौबद वाजली. ती पृथ्वीराजानें एकून तयारीची गर्दी चालविली. परंतु संयोगतेला तीं वाद्यें आणि तो नगाऱ्याचा आवाज केवळ मृत्यूचें बोलावणें आहे असा वाटूं लागला! शेवटीं पृथ्वीराजानें संयोगतेस शेवटचें प्रेमालिंगन देऊन तिची रजा मागितली. तेव्हां संयोगतेनेंही त्याला कडकडून मिठी मारिली आणि ह्मणाली, 'प्रियकरा, आतां आपण तर चाललां! माझा जीव अतःपर उदकावर जोंपर्यंत राहील तोंपर्यंत ठेवीन, नाहीं तर त्याचें आपले चरणीं अर्पण केलेंच आहे! आतां आपली भेट स्वर्गलोकीं होईल!' इतकें ह्मणून ती स्तब्ध झाली.

पृथ्वीराजाचे सामंतांपैकीं ह्या वेळीं अवघे दोनच सामंत अवशिष्ट होते. एक चामुंडराय आणि दुसरा रामगुरु पुरोहित; त्यांत चामुंडराय तर कैदेंत असून त्यानें लोहशस्त्र न धरण्याची प्रतिज्ञा केली होती. तथापि, त्यानें पुढें प्रतिज्ञाभंग न करितां व प्रसंगीं स्वामिकार्यास उपयोगीं पडण्यासाठीं धनुष्यबाण धारण करून युद्धाची सिद्धता केली व बंधमुक्त होऊन तो सैन्याबरोबर जाण्यास निघाला. त्याचे बाणांस त्यानें लोखंडाचें अग्र ठेविलें नाहीं. जें होईल तें साध्या धनुष्यबाणानेंच स्वामीला साह्य करीन असा त्यानें निश्चय केला. आणि चंद भाट देवीचे देवळांत जाऊन बसला व तेथें त्यानें हा ग्रंथ लिहिण्यास सुरवात करून तो संपविला.

ह्याप्रमाणें दोन्ही लष्करें संनिध आलीं. तेव्हां चामुंडरायानें राजाला विचारिलें कीं, 'प्रथम शरसंधान कोणावर धरूं? राजानें सांगितलें कीं, जो राजद्रोही होऊन शत्रूकडे फितूर झाला त्या हाहुलीरायावरच पहिलें शरसंधान धर.' चामुंडराय ह्मणाला, 'राजद्रोही मनुष्याचा मागाहून समाचार घेतां येईल. परंतु अगोदर गोरीला बाण मारून त्याची गठडी करूं द्या; ह्मणजे मुसलमानांची फौज घाबरी होऊन सैरावैरां पळूं लागेल व आपणास यश येईल.' पण वि-

नाशकाल समीप आल्यामुळें राजाचा आग्रह अगोदर हाहुलीराया-चाच नाश करण्याविषयीं पडल्यामुळें चामुंडरायानें हाहुलीरायावर शरसंधान केलें. त्याबरोबर हाहुलीराय धाडदिशीं खालीं पडला व त्याचें प्राणोत्क्रमण झालें. त्यानंतर पृथ्वीराजानेंही एक बाण शहाबुद्दीनावर फेंकला. पण तो त्यास लागला नाहीं. फक्त त्याच्या दांतांला स्पर्श करून गेला. तेव्हां पृथ्वीराज ह्मणालाः—

**'दिन पलट्यो पलटी घडी पलटी हथ्थक बान ।**
**पीथल एहीज पारखुं, दिन पलट्यो चहुआन ॥'**

ह्मणजेः—'हे चव्हाणा, दिवस पालटला, घडी बदलली, आणि हातांतील बाणही निःसत्व झाला.'

पुढें तातारखां नांवाच्या एका सरदारानें पृथ्वीराजावर हल्ला करून त्यास धरिलें. तेव्हां पृथ्वीराज त्याला ह्मणाला, 'मीं शहाबुद्दीन गोरीला सात वेळ धरिलें पण तितक्याही वेळ सोडून दिलें; पकडून ठेविलें नाहीं. आणि मी तर पहिल्यानेंच सांपडलों तेव्हां तूं मला पकडून ठेवूं नयेस. माझा विनाशकाळ समीप आल्याचें भविष्य मला अगोदरच कळलें आहे. तेव्हां मला तूं सोडून दे.' यावर तातारखां बोलला, 'याकरितांच तुला आतां सोडून देतां उपयोगी नाहीं. तूं सात वेळां शत्रूला धरिलेलें सोडून दिलेंस ह्मणून मोठ्या फुशारक्या मारतोस हाच तुझा मूर्खपणा होय. पहिल्या पकडीबरोबरच तूं जर तुझ्या शत्रूस अडकवून टाकिलें असतें तर आजचा दुर्धर प्रसंग तुजवर कशानें आला असता? या तुझ्या मूर्खपणाचें फळ तूं आज भोगिलें पाहिजे. तुझ्या फुशारक्यांत कांहीं अर्थ नाहीं.'

ह्याप्रमाणें पृथ्वीराज अडकून पडला. तरी त्याच्या फौजेबरोबर गोरीचें तीन दिवस सारखें युद्ध चाललें होतें. तिसरे दिवशीं पृथ्वीराजाचा साह्यकर्ता, परम मित्र आणि शूर सरदार जो चितोडचा समरसिंह रावळ हा आपला पुत्र कल्याण आणि बरोबर आलेली तेरा हजार फौज यांच्यासह नाश पावला. त्याच्या मृत्यूचें वर्तमान त्याची परम साध्वी भार्या पृथा इणें ऐकून व परम प्रिय पुत्र कल्याण याच्या मृत्यूनें शोकाकुल होऊन पतीच्या शवाबरोबर सहगमन केलें. ही पृथा

पृथ्वीराजाची बहीण असल्यामुळें समरसिंह हा राजाचा प्रिय मित्र असून त्याचें त्याच्याशीं मेहुण्याचेंही नातें होतें. पृथा हिणें सहगमन तर केलेंच. पण तिला शेवटीं फार कष्ट झाले. एकुलता एक मुलगा पडला व भाऊ (पृथ्वीराज) कैद झाला; त्याचप्रमाणें दिल्लीचें भावाचें व चितोडचें (रावळांचें) सर्व वैभव नष्ट झालें. त्यामुळें ती फार दुःखी होती. परंतु क्षत्रियकुलांत आणि शूरांचे वंशांत असे अनर्थप्रसंग ह-मेषा येण्याचा संभव असतोच व त्याकरितां त्यांच्या स्त्रिया व आप्तमं-डळी आपलीं अंतःकरणें प्रथमपासूनच दगडापेक्षांही कठीण करून ठे-वीत असतात! त्याप्रमाणें हे सर्व ऐहिक सुखदुःखांचे विचार एकीकडे ठेवून तिनें अग्निप्रवेश केला. अस्तु.

ह्याप्रमाणें पृथ्वीराज शत्रूचे हातीं सांपडला व समरसिंह मारला गेला. अशी व्यवस्था झाल्यावर शहाबुद्दीनाला सर्व रान मोकळेंच सांपडलें. त्यानें लागलेंच दिल्ली व चितोड हीं शहरें सर करून आ-पल्या ताब्यांत घेतलीं. दिल्ली येथें चव्हाणवंशांतील बीजरूप असा पृथ्वीराजाचा मुलगा जो रेणसी तो राहिला होता. पण तोही या ग-डबडींत ठार झाला.

ही लढाई कागर नदीच्या कांठीं झाल्याचा चंदाचे 'रासां' त दाखला आहे. परंतु ही नदी हल्लीं मुळींच नाहीं. ती सुकून गेली अ-सावी. टॉड् साहेबांनीं जो शोध करून माहिती लिहिली आहे त्याव-रून असें दिसतें कीं, तिचें मूळ शिवालिक पहाडांत असून तिचे कांठीं हसार, भटनेर, रंगमहाल, बलर, फुलरा हीं पूर्वीचीं व ज-सलमीर वगैरे हल्लींचीं शहरें असावीं असें वाटतें. अस्तु.

पृथ्वीराजाची गोरीशीं लढाई झाली त्या वेळीं कनौजाहून जयचं-दही आपल्या जांवयाचे साह्यार्थ आला होता. परंतु पृथ्वीराजाचा स-र्वांशांनीं मोड झाल्यावर जयचंदही माघारा पळून गेला. तरी आपल्या मागें शहाबुद्दीनाचें धरणें आलेलें बघून, शत्रूंच्या हातीं पडून म्लेच्छा-च्या हातानें मरावें त्यापेक्षां आपल्या हातें आपल्या देहाचें कांहीं सार्थक करावें ह्मणून, त्यानें गंगानदीमध्यें आपल्याला घालून घेऊन आपला अंत करून घेतला. ह्याप्रमाणें दिल्ली व कनौज हीं दोन्ही शहरें जीं

हिंदूंच्या राजधानींचीं होतीं त्यांचें त्या दिवसापासून हिंदूंकडील स्वामित्व नष्ट झालें. ही गोष्ट विक्रम संवत् १२४९ ह्मणजे इ० स० ११९३ या वर्षी झाली.

ह्या वेळेपासून पुढें दिल्ली व कनौज वगैरे प्रांतांत अराजकता होऊन लुटालुटी व कत्तली चालल्या. त्या क्रूर व जंगली लोकांनीं धर्मसंबंधीं जीं कांहीं ठिकाणें होतीं त्यांचा नाश करून कलाकौशल्याच्या कामांचा विध्वंस केला. राजस्थानांतील प्रत्येक शहर आणि त्या शहरांतील प्रत्येक रस्ता रक्तानें भिजलेला दिसे. शहाबुद्दीन लूटफाट करून व पृथ्वीराजाला घेऊन गेल्यावर त्याचे मागून नवनव्या टोळ्या येऊन त्यांनींही लुटालुटी आणि मारामारी करीत जाण्याचा सपाटा चालविला. ते सर्व लोक मुसलमानांशिवाय इतर लोकांस काफर (धर्मभ्रष्ट) समजून त्यांना मारण्यापासून पुण्य लागतें असें समजत. ते लुटालूट करणें हें कृत्य सशास्त्र समजून, देवळें व मूर्ती यांचा नाश करण्याविषयीं तर देवाचा हुकूमच आहे अशा प्रकारची त्यांची दृढतर समजूत असे. ह्या दंग्यामुळें कितीएक जातींचा तर इतका सत्यानाश झाला कीं, त्या अगदीं नाहींशा होऊन केवळ नाममात्रावशेष राहिल्या आणि सर्व हिंदुस्थानभर उलटापालटी झाल्या!

या दंग्यामुळें हिंदुस्थानची ही स्थिति झाली. आतां तिकडे पृथ्वीराज कैद होऊन गेला, तेव्हां त्याची स्थिति काय झाली ती बघूं. या संबंधानें दोन मतें आहेत. टॉड् साहेबांच्या लेखांत असें आहे कीं, पृथ्वीराजाला पकडल्याबरोबर त्याचा शत्रूंनीं नाश केला व त्याची प्रियभार्या संयोगता ही त्याजबरोबर सती गेली. आणि या मतास विरुद्ध प्रकारची दुसरी हकीगत अशी आहे कीं, पृथ्वीराजाला कैद करून मात्र नेलें; परंतु त्याचा वध न करितां त्याच्या गळ्यांत शंभर मणांची बिडी घालून त्यास गिझनी येथें बंदिशाळेंत टाकिलें, व तेथें पुढें तो, शहाबुद्दीन आणि चंद भाट हे मरण पावले असा लेख सांपडतो.

हें सर्व महायुद्ध होत असतां चंद भाट देवीचे देवळांत जाऊन बसला होता असें वर लिहिलें आहेच. त्याप्रमाणें त्यानें तेथें बसून

सर्व **'रासा'** ग्रंथ लिहिला; व नंतर बाहेर येऊन पाहतो तों सर्व **दिल्ली** शहर उजाड व उद्ध्वस्त झालें असून राजा कैद होऊन **गिझनीस** गेला असें त्याला समजलें. तेव्हां अशा संकटांतून त्याला युक्तीनें मुक्त करावें या हेतूनें तो तसाच पुढें **गिझनीस** गेला. तेथें गेल्यावर फार चतुराईनें त्यानें **शहाबुद्दीनाकडून पृथ्वीराजाचे** भेटीची परवानगी मिळविली. नंतर जाऊन राजाला पाहतो तों दुष्ट शत्रूंनीं त्याचे डोळे फोडून त्यास अंधळें केलें आहे व त्याच्या गळ्यांत शंभर मणांची बिडी अडकविली आहे; असें पाहून त्याला फार वाईट वाटलें. परंतु उपाय काय? **चंद भाट** आपल्या भेटीस आला आहे असें **पृथ्वीराजाला** समजतांच त्यास जो आनंद झाला तो सांगतां येत नाहीं. बिडीच्या वजनानें आणि अंधत्वानें तो अगदीं दीन होऊन खंगला होता. परंतु **चंद भाट** त्याचे जवळ गेल्याबरोबर त्याला जी हुशारी वाटली त्यासरसा तो सर्व दुःखवेदना विसरून तट्कन उभा राहिला आणि त्यानें **चंदाला** मोठ्या प्रेमानें कडकडून आलिंगन दिलें. त्यानंतर त्या उभयतांच्या हितगुजाच्या व शोकसमाधानाच्या गोष्टी झाल्या. हें सर्व वर्तमान **शहाबुद्दीनाच्या** हेरांनीं त्याला जाऊन सांगितलें. **चंदास** पाहिल्याबरोबर येवढ्या जड बिडीचें तो ओझें न मानितां तट्कन उभा राहिला ही गोष्ट तर **शहाबुद्दीनाला** विशेष वाटून त्यानें त्याला आणखी ज्यास्त वजनाची बिडी घालण्याविषयीं हुकूम दिला. परंतु **चंदानें** जाऊन **शहाबुद्दीनाला** नम्रतेनें विनंति केली कीं, 'दृष्टि जाऊन सर्वांशीं पंगु झाल्यावर त्याचा अशा प्रकारें छळ करणें शूरास विहित नाहीं.' अशा प्रकारचें गोड व मिष्ट बोलणें ऐकून **शहाबुद्दीनानें** दीडशें मण वजनाची बिडी घालण्याचा आपला हुकूम रद्द केला. पुढें **शहाबुद्दीनाला चंद** ह्मणाला, 'मी राजाला अशा दुःखावस्थेंत कांहीं समाधान व्हावें ह्मणून आलों आहें. परंतु तो नेत्र गेल्यामुळें अत्यंत हीन दीन झाला असून त्यांत त्याचे हातापायांत आणि गळ्यांत येवढाल्या जड बिड्या घातल्यामुळें तो अगदीं अशक्त झाला आहे. त्याला कैदेंतच मोकळा राखून त्याजकडून मोठमोठे चमत्कार व उपयोग करून घेण्यासारखा तो कुशल मनुष्य आहे. तो शब्दवेधी असून त्याचें शरसंधान फार तीव्र

आहे. तो जरी अंधळा झाला आहे तरी शंभर शंभर मण वजनाचे सात तवे एकापुढें एक ठेविले असतां त्यांचा तो बिनचूक वेध करील, व हा चमत्कार बघण्यासारखा आहे.' यावर तो चमत्कार पाहाण्याचें शहाबुद्दीनानें ठरविलें. परंतु चंदानें सांगितलें कीं, 'सध्यां पृथ्वीराज मनस्वी अशक्त झाला आहे. त्याच्या हातापायांतील शृंखला काढून त्याला मोकळें ठेवा व पौष्टिक खाणेंपिणें आणि खुराक चालू करा, ह्मणजे तो मीं सांगितलेला चमत्कार दाखविण्यास समर्थ होईल.' हें ऐकिल्यावर शहाबुद्दीनानें त्याप्रमाणें करण्याचा हुकूम दिला व तसें झाल्यावर लौकरच पृथ्वीराज पूर्ववत् ताकददार झाला.

पुढें त्याचा वेधचमत्कार पाहण्याचा दिवस नेमिला. तेव्हां त्यास तीरकमान दिली व तवे वगैरे लावून सर्व तयारी केली. राजानें हातांत कमान आल्यावर एकदां ओढून पाहिली तों ती तुटून गेली. तेव्हां दुसरी कमान दिली. परंतु तीही तुटून गेली. ह्याप्रमाणें सात आठ वेळां झाल्यावर शहाबुद्दीनानें, खुद्द पृथ्वीराजाचें जें धनुष्य तातारखानें आणिलें होतें तें भांडारांतून मागविलें व पृथ्वीराजाजवळ दिलें. ही वेधचमत्कृति बघण्याचा समारंभ केला खरा; परंतु त्या समयीं पृथ्वीराजाला शहाबुद्दीनानें मोकळें ठेविलें नाहीं. त्या वेळीं पृथ्वीराजाचे पायांत व गळ्यांत' पूर्वींच्याच शंभर मणांच्या जड शृंखला अडकवून त्याला शब्दवेध करण्याविषयीं हुकूम दिला. हा चमत्कार बघण्यास मोठा जनसमूह मिळाला असून सर्व दरबार थाटला होता. खुद्द शहाबुद्दीन सज्जासारख्या एका उंच जागीं सिंहासनावर बसला असून दुसऱ्या बाजूस वर सांगितलेले सात तवे बांधिले होते. एकानें तव्यावर खडा मारून आवाज करावा व त्याबरोबर शहाबुद्दीनानें 'शाबास!' ह्मणून पृथ्वीराजास प्रोत्साहन द्यावें कीं, लागलेच पृथ्वीराजानें तीर सोडून ते तवे वेधावे; असें चंदानें शहाबुद्दीनाला कळवून ठरविलें होतें. पृथ्वीराजाच्या हातापायांत शृंखला अडकवून त्यास चौकांत उभें केलें होतें. व त्याचे जवळच बाजूला चंद उभा राहिला असून आसपास शहाबुद्दीनाचे हत्यारबंद पहारेकरी लोक उभे राहिले होते. संधान साधण्यापूर्वी चंदानें पृथ्वीराजास आपल्या भाषेंतील कवितेनें असें सुचविलें कीं:—

**'चार वंस चोवीस गज, अंगुल अष्ट प्रमाण ।**
**एते पर सुलतान है, मत चूके चहुआण ॥'**

ह्मणजेः—'चार वांवें, चोवीस गज आणि आठ अंगुळें इतक्या उंचीवर सुलतान आहे; तर हे राजा, निशाण चुकूं देऊं नकोस.'

यावर चंदानें पृथ्वीराजास आणखी सांगितलें कीं,

**'इही बाण चहुआन, राम रावण उथप्यों ।**
**इही बाण चहुआन, करणशिर अर्जुन कप्यों ॥**
**इही बाण चहुआन, शंकर त्रिपुरासुर संध्यो ।**
**इही बाण चहुआन, भ्रमर लछमनकर वेध्यो ॥**
**सो बाण आज तो कर चढ्यो चंद बिरद सचो चवे ।**
**चहुआन रान संभरधनी, मत चूके मोटे तवे ॥'**

ह्मणजेः—रामानें रावणास, अर्जुनानें कर्णास, शंकरानें त्रिपुरासुरास व लक्ष्मणानें भ्रमरास ज्याप्रमाणें संधान न चुकवितां मारिलें, तद्वत् हे सांभराधीश चव्हाणराजा, तूं आज या तव्यावर शरसंधान कर.'

चंदाच्या वरील सांगण्यांत बाह्यतः कांहीं भलतासलता मजकूर नाहीं. परंतु त्यांतील गूढार्थ पृथ्वीराज समजला; व ठरल्याप्रमाणें तव्यांवर खडा टाकून आवाज केल्याबरोबर, इकडे बादशाह मोठ्या उत्सुकतेनें सज्जाचे बाहेर तोंड काढून तो चमत्कार पाहण्याचे हेतूनें बसला होता, त्यानें चंदाच्या पूर्वसूचनेप्रमाणें 'शाबास!' असें ह्मणून पृथ्वीराजास प्रोत्साहन दिलें. तों इतक्यांत पृथ्वीराजाचा मोहरा फिरून त्याचा बाण धनुष्यापासून सुटला तों तो शाहाबुद्दीनाचें मस्तक वेधून पार निघून गेला, व त्याबरोबर बादशहा अचेतन होऊन खालीं पडला आणि तत्काळ मेला.

बादशाहाच्या मृत्यूनें मोठा अनर्थ होऊन सर्व दरबारांत हाहाकार झाला. शहाबुद्दीनाचे शिपाई पृथ्वीराजास धरण्याकरितां धांवले. तों पूर्वसंकेताप्रमाणें चंद व पृथ्वीराज यांनीं, म्लेच्छांचे हातानें मृत्यु आला असतां सद्गति मिळावयाची नाहीं ह्मणून एकमेकांनीं एकमेकांचीं शिरें तरवारींनीं छेदून घेतलीं आणि दोघेही खालीं पडले.

ह्याप्रमाणें ह्या इतिहासांतील नायकाचा शेवट झाला; व येथेंच हा ग्रंथ संपला. टॉड् यांच्या व दुसऱ्या हिंदु इतिहासलेखकांच्या माहितींत कोणती तफावत आहे ती वर दर्शविली आहे. या तफावतीच्या संबंधानें दोघांना दोन कारणें आहेत. टॉड् साहेबांचा इतिहास बहुतेक मुसलमानी इतिहासकारांच्या लेखांचे आधारें असल्यामुळें, मुसलमानांनीं आपला कमीपणा लपविण्याविषयीं प्रयत्न करणें संभाव्य असून त्याप्रमाणें वरील हकीकतींत तफावत पडलेली दिसते. परंतु टॉड् साहेबांच्याही ग्रंथास विशेष प्रामाणिक समजणारे लोक असल्यामुळें प्रत्यंतरींचा पुरावा असल्याशिवाय त्या लेखाला निखालस खोटें ह्मणवत नाहीं. हिंदु इतिहासलेखकांचें असें कारण पुढें येतें कीं, त्यांनीं जी वर हकीकत लिहिली आहे तिला प्रत्यंतरींचा पुरावा असा आहेः— भाट वगैरेंच्या ग्रंथांत व पाठांतरांत तर वरच्याप्रमाणेंच हकीकत येत असून शिवाय जयपुरांत वरील वर्णनाचीं चित्रेंही काढलेलीं मिळतात. आह्मीं ह्या पुस्तकाच्या आरंभीं जें चित्र जोडिलें आहे त्यांत, पृथ्वीराजाच्या शब्दवेधकौशल्याचें परीक्षण करण्यास भरलेल्या दरबाराचा व त्यांतच शहाबुद्दीनावर शरसंधान होऊन तो पडल्याबद्दलचा देखावा आहे. हें चित्र एका फोटोग्राफावरून उतरलेलें आहे व तो फोटोग्राफ ज्या तसबिरीवरून उतरला ती तसबीर जयपूरच्या चित्रलेखकानें शंभर वर्षांपूर्वी काढिलेली आहे. तरी येवढ्यावरून त्या तसबिरीचाच वरील ह्मणण्यास मोठा आधार आहे असें आह्मी ह्मणत नाहीं. दोन्हीही मतें आह्मीं येथें घेतलीं आहेत. त्यांवरून कोणता निर्णय ठरवावयाचा तो वाचकांनीं ठरवावा.

येथपर्यंत लिहिलेलें हें ऐतिहासिक काव्य चंदकवीनें केलें असून त्याचा विस्तार एक लक्ष श्लोकांइतका आहे. या 'रासा'काव्यांत अनेक रस व अनेक प्रसंग यांचीं सुंदर वर्णनें केलीं आहेत व त्यामुळें तें लोकांस अत्यंत प्रिय झालें आहे. हें काव्य सातशें वर्षांपूर्वी झालें असून त्याची भाषा, जशी आपल्या इकडे 'ज्ञानेश्वरी'ची जुनी मराठी भाषा आहे, तद्वत् छप्पन्न भाषांनीं युक्त आहे. तींत संस्कृत, हिंदुस्थानी, गुजराथी, मारवाडी, मेवाडी, ब्रिज, पंजाबी वगैरे अनेक

भाषांचे शब्द मिश्रित झाले असून हीच भाषा त्या काळीं चालत असे व अद्यापि ही **चारणी** भाषा **भाट**लोकांस येत असून या काव्याचा त्या प्रांतांत मोठा लौकिक आहे. या इतिहासापासून काय शिकावयाचें याचें पृथक् विवेचन करण्याचें कारण नसून, तो आपल्या **म**हाराष्ट्र भाषेंत अपूर्व असल्यामुळें आह्मीं या पुस्तकांत थोडक्यामध्यें उतरून घेतला आहे.

